# निवेदन



हें नाटक मीं ता. १८-७-३३ रोजीं लिहावयास घेतलें व ता. २३-९-३३ रोजीं—म्हणजे लिहावयास घेतल्यापासून बरोबर दोन महिने व पांच दिवसांनीं रंगभूमीवर त्याचा प्रथम प्रयोग होणार आहे.

१९२३ सालीं लिहिलेले "सीमोल्लंघन" या नांवाचे माझे कांहीं विनोदी नाट्यप्रवेश मजजवळ पडून होते व मला अशी आशा होती कीं त्या प्रवेशांचेंच सहजासहजीं नाटकांत रूपांतर आपण करून टाकूं शकूं; परंतु प्रत्यक्ष लिखाण सुरू केल्यावर या भ्रमाचें तावडतोब निरसन झालें व तिसऱ्या अंकाचीं सुमारें दहा बारा पानें खेरीज करून बाकीचें सर्व नाटक नव्यानेंच लिहावें लागलें !

वास्तविक नाट्यवाङ्मयासारखें चिरकालीन टिकणारें जबाबदारीचें वाङ्मय इतक्या थोड्या वेळांत लिहून काढणें, हें माझ्या कल्पना व स्वभाव यांशीं विसंगत आहे, परंतु व्यक्तीच्या काय किंवा संस्थेच्या काय आयुष्यांत कांहीं कांहीं असे बिनतोड प्रसंग उद्भवतात कीं, त्यायेळीं आपल्या कल्पना, ध्येयें, आवडी निवडी हीं सारीं बाजूला ठेऊन कांहीं गोष्टी कराव्या लागतात; या न्यायाला अनुसरून मीं हें नाटक लिहावयास घेतलें व शक्य तितक्या थोड्या वेळांत लिहून पुरें केलें. परंतु सूक्ष्म दृष्टीच्या रसिकांना असें दिसून येईल की नाटक विनोदी असलें तरी "आपण हें नाटक नाट्यमन्वन्तरसारख्या जबाबदार संस्थेकरतां लिहीत आहोंत" ही गोष्ट मी विसरलों नाहीं.

नाट्यलेखनाच्या कामांत श्री० अण्णासाहेब कारखाननीस यांनीं वेळोवेळीं दिलेल्या सूचना व तालमी चालू असतांना श्री० दाते यांनीं वेळोवेळीं अत्यंत निर्दयपणें घेतलेले आक्षेप हे माझ्या फारच उपयोगी पडले. रा० दाते यांच्या सारख्या अत्यंत तीक्ष्ण घ्राणेंद्रिय असलेल्या नाट्यचालकाकरतां नाटक ( आणि तेंही इतक्या थोड्या वेळांत ) लिहिण्याचा प्रसंग शत्रूवरही न येवो अशी त्या जगच्चालक प्रभूजवळ ( तो असलाच तर ! ) प्रार्थना आहे !

या नाटकांतील भावगीतें माझे कवि मित्र श्री० काणेकर, काळे, माधव ज्यूलीयन् व विठ्ठलराव घाटे यांचीं आहेत. त्यांनीं आपल्या इतक्या सुंदर कविता मला या पुस्तकांत छापूं दिल्या या बद्दल मी त्या सर्वांचा ऋणी आहें.

पुस्तकाच्या सजावटीचें काम श्री० नी० म० केळकर यांनीं केलें असून हें व याच्या पूर्वीचें नाटक रंगभूमीवर आणण्यांत श्री० केळकर यांनीं जी खटपट केली व जी कार्यक्षमता दाखविली त्यामुळें मलाच काय पण नाट्यमन्वन्तर संस्थेलाही त्यांनीं कायमचें ऋणी करून ठेवलें आहे.

गिरगांव, मुं. नं. ४
१९–९–३३

श्री० वि० वर्तक

या नाटकाचा पहिला प्रयोग ता. २३–९–३३ रोजीं "नाट्यमन्वन्तर" या संस्थेनें करण्याचें ठरविलें आहे. त्यांत खालीं दिलेल्यांनीं कामें करण्याचें नक्की करण्यांत आलें आहे.

## भूमिका



| | | | |
|---|---|---|---|
| विनायक | .... | .... | श्री० के० त्र्यं० दाते (प्रोडयूसर) |
| उर्मिळा | .... | .... | श्री० पद्मावती वर्तक |
| उषा | .... | .... | श्री० ज्योत्स्नाबाई भोळे |
| बाबासाहेब | .... | .... | श्री० पी० वाय्० आळतेकर |
| प्रभाकर | .... | .... | श्री० एम्० आर० रानडे |
| यमूताई | .... | .... | श्री० विमलाबाई वसिष्ठ |
| वाटाणे | .... | .... | श्री० एल्० एम्० केळकर |
| कृष्णा | .... | .... | श्री० के० नारायण काळे |
| शंकर | .... | .... | श्री० प्रभाकर गुप्ते |
| शिवा | .... | .... | श्री० माधवराव प्रभू |
| हरदास | .... | .... | श्री० जी० व्ही० नामजोशी |
| शिपाई | .... | .... | श्री० पी० जे० पितळे |

# " आंधळ्यांची शाळा "

श्री० वर्तक यांचें हें नाटक " नाट्यमन्वंतर लिमिटेड " ही संस्था रंगभूमीवर करीत आहे. शारदा नाटकानंतर अगदीं अलीकडील काळांत जर कोणत्या एकाच नाटकानें नव्या, जुन्या, वृद्ध, तरुण स्त्री-पुरुष या सर्वांना बोलावयास लावलें असेल तर तें यानेंच !

हें नाटक भाषांतर किंवा रूपांतर नसून गॉन्टलेट या नाटकाला उत्तर म्हणून लिहिलेलें आहे हें ठाऊक असूनही एका वृद्ध व प्रथितयश नाटककाराला त्याचा इतका हेवा वाटला कीं त्याला " हें भाषांतर आहे " असें खोटें बोलण्याचा मोह आवरला नाहीं ! अपुरें शिक्षण दुसरें काय ! ! परंतु तुम्ही मात्र असल्या अशिक्षित टीकाकारांवर मुळींच विश्वास न ठेवतां हें नाटक वाचा, गॉन्टलेट्शीं त्याची तुलना करा, प्रयोग पहा, पुन्हां वाचा म्हणजे तुम्हांस दिसून येईल कीं, मराठींत एक स्वतंत्र, अत्यंत तेजस्वी व नवमनू घडवून आणणारें तत्त्ववादी नाटक निर्माण झालें आहे !

**किंमत १ रुपया**

प्रकाशकः—**ट्युटोरियल प्रेस,**

गिरगांव बॅक रोड, मुंबई नं. ४

# लपंडाव

---

## अंक १ ला

[ **स्थळः**—बाबासाहेबांच्या वाड्यांतील एक दालन. प्रेक्षकांचे उजवे बाजूस महिरपींत देवघर. डावे बाजूस विनायकाची खोली. दोहोंचे मधून मागील पडवींत जाण्याचा मार्ग. पडवीला जाळी असून त्यांतून वाड्याचे आवाराचा भाग दिसतो. दालनाचे पुढील भागांत प्रेक्षकांचे उजवे आंगचे भिंतींत बाहेरून येण्याचा दरवाजा. विनायकाचे खोलीला उजवे बाजूस दालनांत येण्याचा दरवाजा असून तो बंद आहे. खोलीच्या लगत बाहेरच्या अंगाला नवीन तऱ्हेचें फर्नीचर. देवघरासमोर बाहेरच्या पडवींत बाबासाहेब एका पाटावर संध्या करीत बसले आहेत.

बाबासाहेबांचें शरीर धिप्पाड असून, पैलवानासारखें कसलेलें आहे. सर्व अंगाला भस्माचे पट्टे फासलेले असून गळ्यांत व दंडांत रुद्राक्षाच्या माळा आहेत. त्यांची संध्या आटोपली असून ते ध्यानस्तोत्र म्हणत आहेत ]

**बाबा०ः**—" मुक्ताविद्रुमहेमनीलधवलच्छायैर्मुखैर्स्त्र्यक्षणैः " (मध्येंच पाहून) शिवा ! ए शिवा ! !

**शिवाः**—( आंतून ) जीऽऽ ( येतो )

**बाबा०ः**—कायरे, या खुर्च्या इतक्या पुढं कुणी मांडल्या ?

**शिवाः**—( गोंधळतो ) मना वो काय म्हाईत !

**बाबा०ः**—( चिडून ) तुला काय माहीत ! मग काय मी मांडल्या होय ? का कांहीं चाकर नोकर ठेवले आहेस तूं आपल्या हाताखालीं ही असलीं बारीक सारीक कामं करायला ! !

**शिवाः**—मना चाकुर कसा ठेवाया गावनार श्येट्! मी काय सोनगांवचा अन् आंबेगांवचा जागिरदार ......

**बाबा०ः**—खबरदार फाजील बोललास तर ... चल उचल त्या खुर्च्या; कर गोळा त्या टेबलाभोंवती आणखीन् लक्ष्यांत ठेव, विनायकाला सांग बजावून कीं तुझ्या या खुर्च्या जर अशा माझ्या संध्येच्या पाटाकडे धिंगाणा घालूं लागल्या ...

**शिवाः**—धनी, त्ये न्हाई जमनार आपल्या हातून—आपुन सांगाल तर समद आवरून ठयेवतो पन् धाकल धन्याला आपुन् काईपन् सांगनार न्हाई !

**बाबा०ः**—( भडकून ) ठीक आहे ! शिवा ! ! ही महिन्याची नोटीस समज ! चल जा, आपल्या सर्व सामानाची आवराआवर कर ! एक दिवस टेवणार नाहीं आतां तुला या घरांत ! चल ! आपला चालू महिन्याचा आणखी नोटिशीच्या महिन्याचा पगार घे आणखी चालू लाग !

**शिवाः**—( रडकुंडी आल्यासारखें दाखवून ) धनी, खुर्च्या हकड आल्या तर तुमी पिसालतांव अन् तकड् न्येल्या तर धाकट् धनी वराडत्यात्—मंग आम्ही गरिबांनीं काय मरावं होय ?

**बाबा०ः**—शिवा या घरांत मालक कोण—बोल !

**शिवाः**—मालक !

**बाबा०ः**—हो हो मालक !

**शिवाः**—योक तुम्ही—अन् योक धाकट धनी !

**बाबा०ः**—धाकटे धनी ! धाकटे धनी ( संतापून ) चोरा—पुनः जर या घरांत दोन मालक आहेत, असं बोललास तर लक्ष्यांत ठेव—तुला पगार कोण देतं !

**शिवाः**—धाकट धनी !

**बाबा०ः**—पण तो माझ्या आज्ञेवरून !

**शिवाः**—तें मना काय ठांवा !

**बाबा०ः**—चल आवर त्या खुर्च्या, ठेव सर्व जागच्या जागीं.

[ शिवा खुर्च्या आवरूं लागतो. परंतु त्या इतक्या पुष्कळ आहेत कीं बाबासाहेबांच्या क्षेत्रांतून त्यांचे एक पाऊलही मार्गे जाण्याचें चिन्ह दिसत नाहीं. बाबासाहेबांच्या तें लक्षांत येऊन ते संतापतात व खुर्च्या टेबलावर उचलून ठेवण्याची शिवाला आज्ञा देतात. तो तसें करतो; इतक्यांत एक तरुण वयाचे हरदासबुवा प्रवेश करतात. शिवा आंत जातो. हरदासाला पाहतांच बाबासाहेबांना अर्धवट राहिलेल्या ध्यानस्तोत्राची आठवण होते व अर्धोन्मीलित नेत्रांनीं हरदासाकडे पहात ते ध्यानस्तोत्र म्हणावयास सुरवात करतात.

हरदासाचें वय सुमारें तीस. शरीरयष्टि भरदार; अंगांत अंगरखा, डोक्याला पगडी; पायांत चटचटीत पुणेरी जोडा ]

**हरदासः**—संध्या आटोपली वाटतं !

**बाबा०ः**—हं ! मुक्ताविद्रुमहेमनील...

**हरदासः**—वा ! संध्या संपल्यावर आपण हें ध्यानस्तोत्र म्हणता वाटतं ! फार छान् ! फार छान् ! ! मलाही तें आवडतं ! काय शब्द-माधुर्य ! काय अर्थगांभीर्य ! !

**बाबा०ः**—हं ! मुक्ताविद्रुमहेमनीलधवल...

**हरदासः**—काल आपण कीर्तनाला आलांत, मला फार समाधान वाटलं.

**बाबा०ः**—हं ! छायैर्मुखैर् ...

**हरदासः**—( त्यांस मध्येंच अडवून ) कीर्तन कसं काय आवडलं आपल्याला ?

[ बाबासाहेब त्यानें जास्त प्रश्न विचारून अडवूं नये म्हणून उन्नतस्वरानें जोरजोरानें ध्यानस्तोत्र म्हणतात पण हरदासबुवा पुनः विचारतात—" कालचं आख्यान मजेदार नाहीं वाटलं आपल्याला "— त्यास उद्देशून ]

**बाबा०ः**—कायरे ए ! तूं ब्राह्मण कायरे ? कांहीं अक्कल आहे का टाळक्यांत ? हं चल विचार, काय विचारायचं आहे तुला ? तूं संध्या नाहीं सुचूं द्यायचास मला !

**हरदासः**—कांहीं नाहीं, म्हटलं कालचं आख्यान कसं काय आवडलं आपल्याला ?

**बाबासा०ः**—अरे इतका तर निपटारा आहेस कीं तुला शब्दरचना सुद्धां सुचत नाहीं ! विष्णूनं शंखासुराच्या पाठींत सुदर्शन चक्र बदाबदा मारलं कायरे ! विष्णूचं चक्र म्हणजे काय चेंडू होता रबराचा ! आणखी मध्येंच दाखल्याकरता कृष्णावतारांतील गोष्ट सांगितलीस त्या वेळेला तुझा मेंदू ठिकाणावर तरी होता का ? ( वेडावून ) 'गवळीयांच्या घरीं ! श्रीकृष्ण करी चोरी !' असं म्हटल्या-बरोबर, सगळ्या वाती काढीत बसलेल्या बायका आणखी तप्किरी ओढीत बसलेले पुरुष, खुष ! योगेश्वर कृष्णाला नुसता चोर आणखी जार बनवला आहे गुलामांनीं !

**हरदासः**—पण बाबासाहेब या लीला आहेत देवाच्या !

**बाबासा०ः**—पण देवाच्या या लीला ऐकून ऐकून माणसं गिरवतील त्याची वाट काय ?

**हरदासः**—पण बाबासाहेब आपल्याला निरूपण कसं काय आवडलं ?

**बाबासा०ः**—नर्मद्या गणपती ! त्या ठिकाणीं तर तूं आपली सर्वच अक्कल खर्च केलीस ! पृथ्वीवर दारु पिणं सोडायचं, वेश्यागमन टाकायचं,—तें सारं स्वर्गांत अप्सरा मिळवण्याकरतां कायरे ? मग मूर्खा हातचं सोडून पळत्याच्या मागं लागायचं कशाला ! अप्सरा म्हणजे इंद्राच्या घरच्या गाणारणी आणखी नाचणारणी; थोडक्यांत सांगायचं म्हणजे वेश्या—कसबिणी ! शिवाय त्या कुणी पाहिल्यासुद्धां नाहींत — त्या मिळवायसाठीं आज आयती ओंठाशीं असलेली बाटली आणखी पोटाशीं धरलेली बिजली सोडायची जरूर काय ? चांगलं ध्येय ठेवता लोकांसमोर !

**हरदासः**—पण बाबासाहेब......

**बाबासा०ः**—तुला खरं सांगू तुमचीं कीर्तनं आणखी साळू मैनाचा तमाशा यांत मला कांहीं फरक वाटत नाहीं—चल ! आतां दोनप्रहरीं ये ! स्तोत्र पुरं करूं दे मला !

**हरदासः**—पण बाबासाहेब माझं येण्याचं मुख्य काम तर राहूनच गेलं ! आज सकाळीं नानांचं पत्र आलं आहे !

**बाबासा०ः**—( कपाळाला आठ्या घालून ) अस्सं ! काय म्हणतात ते !

**हरदासः**—कांहीं नाहीं, चार आठ दिवसांत उषाच्या कॉलेजला सुटी लागेल, तेव्हां ती आणखी तिची मैत्रीण उर्मिळा या दोघी पूर्वी ठरल्याप्रमाणं घरीं जायच्या होत्या, पण नानांना एकाएकी आठ पंधरा दिवसाकरतां बाहेर गांवीं जावं लागणार आहे, तेव्हां त्या दोघी आपणाकडे रहावयास येणार आहेत—तरी आपण त्यांची नीट व्यवस्था करावी अशी त्यांची विनंती आहे.

**बाबासा०ः**—( आश्चर्यानें थक्क होऊन ) उषा माझ्या घरीं ! आणखी तिची मैत्रीण उर्मिळा ! ! गृहस्थांनो तुमचीं डोकीं ठिकाणावर आहेत का ! अरे ! नुक्तंच—आय्. सी. एस्. नवरा मिळावा म्हणून—विनायकाचं आणखी तिचं लग्न मोडतां, आणखी आतां त्या प्राण्यानं नकार दिल्यावर तिला माझ्या घरीं पाठवतां !

**हरदासः**—इतकं झालं असेल अशी मला कल्पनाच नव्हती !

**बाबा०ः**—तुला कल्पना नव्हती ! तूं मध्यस्ती नव्हतास ! अरे वाणगटा—

**हरदासः**—वाणगटा ! ही कांहीं नवीनच शिवी दिसते आहे !

**बाबा०ः**—अरे लग्नाचा सवदा पटवणारे तुम्ही ! वाणगट नाहींतर काय ! बरं चल जा, जाऊन सांग तिला—ये म्हणून—जा !

**हरदासः**—तें तर मी तिला अगोदरच सांगून टाकलं आहे ! तिची यायची वेळ सुद्धां झाली !

**बाबा०ः**—( थक्क होऊन ) अगोदरच सांगून टाकलं आहे ! माझी परवानगी न घेतां !

**हरदासः**—परवानगी ! आपण नाहीं थोडेच म्हणणार होतां !

**बाबा०ः**—बरं ! बरं ! येऊं दे तिला इथं ! येऊं दे ! म्हणजे तिला वावटळ म्हणजे काय चीज असते हें दिसेल !

**हरदासः**—बाबासाहेब पहा बरं ! पोर मोठी लाघवी आहे ! घरांत चार दिवस राहिली तर सूनच होऊन जायची !

**बाबा०ः**—माझ्या विन्यानं जर तिच्याशीं लग्न केलं तर घरांतून हांकलून देईन दोघांना ! काय समजला आहेस तूं मला ! बरं चल आतां !

[ हरदास नमस्कार करून जातो. बाबासाहेब स्तोत्र म्हणावयास सुरवात करतात. स्तोत्र म्हणतां म्हणतां मध्येंच ]

शिवा ! ए शिवा ! !

**शिवा:**—( आंतून ) जी ऽ ऽ ( बाहेर येतो ).

**बाबा०:**—शिवा, त्या खुर्च्या काढ खाली, आणखी मांड पूर्वी जशा होत्या तशा !

[ शिवा आपल्याला हें सारें पूर्वीच माहीत होतें असें दाखवीत तोंडानें शीळ घालतो व आनंदानें मान हलवीत खुर्च्या नीट होत्या तशा मांडूं लागतो ]

**बाबा०:**—( संतापून ) कायरे शीळ कां वाजवतो आहेस ! आनंद कसला झालाय् तुला !

**शिवा:**—आनंद कसला......

**बाबा०:**—खबरदार तोंडाला तोंड दिलंस तर—जा आंत विनायकाला बोलाव इकडं.

**शिवा:**—धाकट धनी उट्‌ल न्हाईत अजून !

**बाबा०:**—उठला नाहीं ! उठला नाहीं ! ! दहा वाजायला आले तरी ! जा अगोदर उठव त्याला ( शिवा हलत नाहीं ) उठव म्हणतो ना !

[ शिवा विनायकाच्या खोलीच्या दरवाजाकडे जाऊं लागतो. प्रेक्षकांच्या बाजूकडील विनायकाच्या खोलीचा पडदा वर जाऊन त्यांस त्याच्या खोलीचें अन्तर्दर्शन होतें.

खोलीला डावे बाजूस घरांत जाण्याचा दरवाजा आहे. मागील भिंतींत खिडकी असून तींतून पडवीचा भाग दिसतो.

विनायकाची खोली विलक्षण अस्ताव्यस्त असून टेबलावर पुस्तकें ढिगाऱ्यांनीं पडलेली आहेत. खोलीभर फाडलेल्या कागदांचे चिटोरे उडलेले आहेत. खोलीच्या मध्यभागीं असलेल्या अंथरुणाजवळ हजामतीचें सामान व असंख्य मासिकें आणि वर्तमानपत्रें अस्ताव्यस्त पडलीं आहेत. जवळच

एक फूटबॉल व त्यांत हवा भरण्याचा पंप पडला आहे. वेळ सकाळची दहा वाजण्याची असून सुद्धां विनायकाच्या बरोबर डोक्याच्या मागें टांगलेला विजेचा दिवा अजून तसाच जळतो आहे. विनायकाचा बिछानाही निजण्याच्या अगोदर नीट घातलेला दिसत नाहीं. त्यावर विनायक निजला असून छातीवर अजून पुस्तक तसेंच पडलेलें आहे.

विनायकाच्या उजव्या हातास कॉलेजांतून पळवलेल्या कांचेच्या ॲपॅरेटसची केलेली एक गुडगुडी पडलेली आहे. तिच्या रबराच्या नळीचें एक टोंक त्याच्या अंथरुणावर आहे. शिवा दरवाजाजवळ जाऊन पाहतो तों दरवाजा आंतून लावलेला ! ]

**शिवाः**—( हांका मारतो ) धनी—ओ धनी ! ओ धाकल धनी !

**बाबा०ः**—बरं राहूं दे त्याला; तूं जा आपल्या कामाला !

[ शिवा 'जी व्हय' म्हणून घरांत जातो. विनायक पेंगत अंथरुणांतून उभा राहतो व लाथेनें अंथरुण गुंडाळतो. लाथ मारींत असतां त्याच्या पायाला पाण्याचा तांब्या लागतो म्हणून त्यावर संतापून त्या तांब्याला फुटबॉलसारखी ठोकर मारावयाचा प्रयत्न करतो तों त्याला मागें असलेली खुर्ची लागते. त्याबरोबर पाऊल हातांत धरून तो 'ओय् ओय्' करीत खोलींत लंगडशाही घालतो. इतक्यांत शिवा हातांत केरसुणी घेऊन प्रवेश करतो. त्याला पाहून—]

**विनायकः**—शिवा ! धांव धांव लवकर अंथरुण पसर ! अंथरुण पसर !! नाहीं तर तुझा धाकटा धनी खल्लास !

**शिवाः**—हल्लू ! हल्लू !! मोटं धनी भाईर हैत ! संध्या चाललीया, अन् तुमास्नी गोमितर पाजाया टपून्शान् बसल्याती बोक्यावानी !

**विनायकः**—बरं बरं बसूं दे ! अंथरुण पसर अगोदर !

[ शिवा अंथरुण पसरतो. विनायक त्याच्यावर उशा मांडून नबाबासारखा बसतो व शिवाला आणखी जास्त उशा आपल्या अंगाभोंवतीं लावण्याची खूण करतो, आणि नंतर शिवाकडे काड्यांची पेटी फेंकून ]

शिवा ! चल केरसुणी ठेव खाली ! ही पेटी घे अन् पेटव ही गुडगुडी !

[ शिवा हंसत गुडगुडी पेटवतो. घरांतल्या दरवाजानें बाबासाहेब पंचगव्य घेऊन हळूच आंत येतात. शिवाची नजर त्यांच्याकडे जाऊन तो घाबरतो; पण बाबासाहेब त्याला 'चूप' अशी खूण करतात. तो पुढील भाषणें चालली असतां घाबरलेला असतो पण बाबासाहेबांच्या भितीने विनायकाला कांहींच सूचना देत नाहीं. विनायक नबाबासारखा उशांशीं टेकून डोळे मिटून गुडगुडी ओढतो ]

**विनायकः**—शिवा ! हम् नबावजादा है—काय समजलास !

**शिवाः**—जी व्हय !

**विनायकः**—तुम हमारा वझीर है !

**शिवाः**—जी व्हय !

**विनायकः**—बाबासाहेबकू जाके सांगो की अम्ही अब यापुढें संध्या कधीं करणार नाहीं.

**शिवाः**—जी व्हय !

**विनायकः**—गोमुत्र—पंचगव्य पिणार नाहीं ! मनाला वाटेल त्या औरत-बरोबर शादी करूं ! काय समजलास ?

**शिवाः**—जी व्हय करा कीं ! न्हाई कोन् म्हन्तुया !

**विनायकः**—बाबासाहेबकू सांग हम अभी छव्वीस वरसका होगया, हम अब तुमचा कांहींच हुकूम ऐकणार नाहीं ! खर्चाला लागणारे पैसे आपल्या हातांत किल्ल्या घेऊन तिजोरींतून काढून घेऊं ! काय समजलास ?

**शिवाः**—जी व्हय !

**विनायकः**—त्यांना सांग आम्ही अजूनसुद्धां तुमच्या धाकानं नाटकं चोरून पहातो—पोहायला लपत छपत जातो !

**शिवाः**—मला म्हाईत हाय ते !

**विनायकः**—तुला माहीत असून काय उपयोग ! आपल्या शत्रूला त्याची जाणीव करून दिली पाहिजे !

**शिवाः**—( बाबासाहेबांकडे पहात भीत भीत ) शत्रू !

**विनायकः**—होय शत्रू ! प्रत्येक बाप हा आपल्या तरुण आणि महत्त्वाकांक्षी मुलाचा शत्रू असतो—शिवा तुला काय वाटतं ?

**शिवाः**—( भीत भीत ) धनी, तुमी लय थट्टबाज ! बाबासायबाइतका पिरमळ बाप द्येवाजवळ भीक मागूनशान् पन न्हाई मिळायचा.

**विनायकः**—( जोरानें गुडगुडी ओढीत ) भ्रम आहे तुझा हा शिवा !— अन् कायरे लुच्चा उठल्याबसल्या तूं सुद्धां नाहीं बाबासाहेबांना खाष्ट म्हणत !

**शिवाः**—( भीत ) मी ! मी ! !

**विनायकः**—घाबरूं नकोस, तुझं म्हणणं खरं आहे ! जा बाबासाहेबांना जाऊन सांग, कीं ही इस्टेट कांही तुम्ही मिळवली नाहीं ! तुमच्या आणखी आमच्या उभयतांच्या बापजाद्यांनीं मिळवली ! मी तुमच्याबरोबरीनं मालक आहे तिचा ! आतां मी हळूहळू सर्व कारभार आपल्या हातीं घेणार आहे ! आणखी शिवा—घरांत जा ! ताईसायबाला सांग, नुसत्या प्रभाकरपंतांशीं गुल्गुल् गोष्टी सांगत बसूं नका ! नबाबजादे जागे झाले आहेत ! त्यांना नाश्ता करायचा आहे— बिछान्यांत नाश्ता करायचा आहे ! त्या फार शहाण्या आहेत ! तोंड धुवायची अक्कल सुचवतील ! त्यांना सांग, तोंड बिंड कुछ धुवायचं नाहीं ! एकदम् चाय लाव—जाव—गेलास कीं नाहीं अजून !

[ शिवा " जी " म्हणून जीव घेऊन निघून जातो. त्याच्या मागोमाग बाबासाहेब बाहेर पडतात व दालनांत येऊन विनायकाच्या खोलीचा दरवाजा ठोकतात व मोठ्यानें हांक मारतात " विनायक ए विनायक ! " बाबासाहेबांचा आवाज ऐकतांच विनायक अंथरुणांतून एक चादर ओढून काढतो व खोलींत पसरलेला धूर बाहेर घालविण्याकरितां ती चादर खोलीभर गरागरा फिरवतो व नंतर ती गुडगुडीवर झांकण टाकतो. त्यानंतर भरभर बिछाना गुंडाळतो व एका हातांत वस्तरा घेऊन दुसऱ्या हातानें घाईघाईनें गालाला साबण लावतो व दरवाजा उघडतो ]

**विनायकः**—बाबा ! आत्तां आलं होतं तुमच्याकडे कोणी ?

[ कांहीं तरी घाण आल्यासारखें दाखवून नाक धरतो ]

**बाबा०ः**—नाहीं !

**विनायकः**—मग तंबाखूची घाण कुठून आली ?

**बाबा०:**—मला तर तुझा दरवाजा उघडतांच वास आला!

**विनायकः**—हं आत्तां आलं माझ्या लक्ष्यांत! हा शिवा येऊन गेला आत्तां इतक्यांत—त्यानं चिलीम ओढली असेल!

**बाबा०:**—( शांतपणें ) मघापासून इतका वेळ वाट पाहतो आहे मी तुझी—करीत तरी काय होतास?

**विनायकः**—हजामत!

**बाबा०:**—मला वांटलं निजला आहेस वाटतं अजून!

[ ताई एका केट्लमध्यें चहा घेऊन प्रवेश करते ]

**विनायकः**—छे! मी अगदीं सकाळपासून उठलो आहे आज! बराच वेळ वाट पाहिली, पण कुणीच उठलं नव्हतं, म्हणून वाचीत पडलो होतो!

**ताईः**—सकाळपासून उठला आहेस! मघापासून मी दोनतीन वेळां इकडं येऊन गेल्यें, तों तूं आपला निजलेला!

**विनायकः**—( तिला डोळ्यानें दाबीत ) छे! मी सकाळींच घरांत येऊन तोंडसुद्धां धुतलं—तूंच तर निजली होतीस डाराड्डूर! म्हणून पुनः येऊन वाचत पडलो!

**ताईः**—मग शिवा कसा म्हणाला आत्तां, कीं तूं आज तोंड न धुतांच चहा घेणार आहेस म्हणून!

**विनायकः**—इतका म्हातारा झाला शिवा आपल्या घरीं नोकरी करतां करतां, तेव्हां थट्टा करतो तो, एवढं समजत नाहीं तुला!

**ताईः**—तो म्हणाला नबाबसाहेब—छे नबाबजादे—उठले आहेत—अंथरुणांत नाश्ता करणार आहेत—तोंड बिंड कुछ धुणार नाहींत आज! ( हळूंच हंसते )

**विनायकः**—ठीक आहे! त्याला माझ्याकडे पाठव म्हणजे काढतो खरडपट्टी.

**बाबा०:**—आणखीन् हे रे काय?

[ गुडगुडीकडे बोट दाखवून चादर बाजूला करण्याकरतां खालीं वांकतात]

**विनायकः**—हं बाबा! तें उघडूं नका!

**बाबा०:**—उघडूं नका! कारण?

**विनायकः**—( अडखळत ) माझा तो प्रयोग आहे रसायनशास्त्रांतला— त्याला उजेड नाहीं लागू द्यायचा एक दोन दिवस !

**बाबा०ः**—पाहूंच दे मला ( उघडतात ) हें रे काय ? ही तर तंबाखू दिसते आहे !

**विनायकः**—( धिटाईनें ) तंबाखूचाच प्रयोग आहे तो !

**बाबा०ः**—तंबाखूचा ! !

( प्रभाकरपंत येतात )

**विनायकः**—बाबा ! तंबाखूंत किनई निकोटाईन नांवाचा एक पदार्थ असतो ! खूप सिगारेट ओढणारे जे लोक असतात ना, त्यांच्या पोटांतल्या आंतड्यावर त्याचा दुष्परिणाम होतो ! मी एम्. एस्सी करतां त्या विषयावर एक उत्कृष्ट निबंध लिहीणार आहे, म्हणून प्रत्यक्ष प्रयोग करून पाहतो आहे !

**ताईः**—मग तुला स्वतःला सुद्धां ओढावा लागत असेल कधीं कधीं !

**विनायकः**—छे ! छे ! ! निकोटाईनचा आंतड्यावर किती दुष्परिणाम होतो याची तुला कल्पना नाहीं, पण मला पूर्ण कल्पना असल्यामुळं यावत्जन्म चुकून सुद्धां तंबाखू कद्धीं कद्धीं ओढणार नाहीं अशी माझी शपथ आहे !

**बाबा०ः**—पण ही तर ओढल्यासारखी दिसते !

**विनायकः**—असा भास होतो ! पण सक्शन् पंपनं...

**बाबा०ः**—सक्शन पंप!—मला तो पुष्कळ दिवसापासून पहायचा होता— पाहूं दे मला !

**विनायकः**—अजून तो मी आणला नाहीं—म्हणून माझा मित्र कृष्णा येतोना—त्याला सिगारेट ओढायची संवय आहे—तेव्हां त्याच्याकडून मी आज सकाळीं बराच वेळ ही गुडगुडी ओढवून धुरांतून किती निकोटीन पोटांत जातं याचं प्रमाण काढीत होतों !

**बाबा०ः**—अस्सं !

**विनायकः**—सापाच्या विषापेक्षां सुद्धां भयंकर आहे तंबाखूतलं विष !

**बाबा०ः**—तूं ओढत नाहीस ना ?

**विनायकः**—छे !

**बाबा०:**—झालं तर मग !

**विनायकः**—तसं नव्हे, पण तुम्ही मागं एकदां मित्रमंडळींत बसला असतां एक सबंध विडीचा कट्टा ओढून टाकण्याची पैज मारून थट्टेनं खरोखरच एक सबंध बंडल ओढून टाकलं—

**बाबा०:**—( त्याची ही धिट्टाई पाहून आश्चर्यानें थक्क होऊन ) बरं मग !

**विनायकः**—म्हणून तुम्हाला आपली ही धोक्याची सूचना देऊन ठेवली—फारच वाईट तें ! एकादे वेळीं आंतड्यावर......

**बाबा०:**—( शांतपणें ) आत्तां हरदासबुवा आला होता—नानांचा निरोप घेऊन.

**विनायकः**—<br>**प्रभाकरः**— } नानांचा ! ! !<br>**ताई:**—

**बाबा०:**—होय नानांचा ! उषा आणखी तिची मैत्रीण उर्मिळा या दोघी आपल्या घरीं चार दिवस पाहुण्या म्हणून येणार आहेत !

**विनायकः**—( आश्चर्यानें थक्क होऊन ) मला अशा तऱ्हेनं वागवल्यावर...

**बाबा०:**—तूं काय बायको आहेस कीं काय?—अशा तक्रारी करायला ! येते म्हणते मर्जी तिची—खुशाल येऊं दे ! पण एक गोष्ट लक्ष्यांत ठेव ! जर तूं पुनः तिच्यावर प्रेम करून तिच्याशीं लग्न करायला सिद्ध झालास...

**विनायकः**—मी तिच्याशीं लग्न ! बाबा...

**बाबा०:**—तुझ्यावर माझा मुळींच विश्वास नाहीं ! तुला खोटं बोलण्याची फार संवय आहे !

**विनायकः**—मी ! मी खोटं बोलतो बाबा ! लहानपणीं कदाचित्—

**बाबा०:**—लहानपणीं नाहीं ! अजून सुद्धां...पण तें असो ! लक्ष्यांत ठेव ! नानासाहेबांनीं आणखी उषानं आपला—आपल्या कुळाचा अपमान केला आहे ! तेव्हां जर तूं पुनः तिच्यावर भाळलास तर तोंड पहाणार नाही तुझं मी ! ( शांत आवाजांत ) प्रभाकरपंत उषा आल्यावर तिला नीट वागवा, तिचा योग्य समाचार घ्या ! तिच्या मैत्रीणीची सरबराई करा ! आणखीन् ए पोरी ! तिच्याशीं नीट

वाग—पण जर तिच्या गळ्यांत गळा घालायला लागलीस तर लक्ष्यांत ठेव मला ठाऊक आहे ती तुझी मैत्रिण आहे म्हणून !

**ताई:**—छे ! बाबा मी मुळीं तिच्याशीं बोलणारसुद्धां नाहीं !

**बाबा०:**—तुम्हाला दोघांनाही मी मूर्ख म्हणतो तें एवढ्याचकरतां ! म्हणे बोलणारसुद्धां नाहीं ! बोलायची का बंदी करतो आहे मी तुला—मूर्ख नाहींतर ! प्रभाकरपंत तुम्हाला माझ्या मनाची पूर्ण कल्पना आहेच, सांगितलं त्याप्रमाणं करा—मला जरा बाहेरून यायला उशीर लागेल !

**प्रभाकर:**—आपल्याला अगदीं काळजी नको !

( बाबासाहेब जातात )

[ विनायक छातीवरील मोठं दडपण नाहींसें झाल्यासारखें करून बाबासाहेबांचे मागून त्यांचेसारखा डुलत जातो ]

**प्रभाकर:**—( तें पाहून ) विनायक, काय हा फाजीलपणा !

**विनायक:**—( प्रभाकराला वेडावीत ) प्रभाकरपंत तुम्हाला माझ्या मनाची कल्पना आहेच !—काय जावई—काय सासरे !

**प्रभाकर:**—( हंसत ) दोघंही मुलं मूर्ख निघाली—तेव्हां त्यांचा तरी काय इलाज ! शहाण्या जावयावर विश्वास टाकणं भागच पडतं !

**विनायक:**—असे हुरळून जाऊं नका बरं जावईबुवा इतक्यांतच ! आपणासंबंधीं बाबा आपल्या पाठीमागं काय बोलतात याची कल्पना नाहीं आपल्याला !

**ताई:**—दादासाहेब, चला आतां चहा उरका ! आणखी लागा आपल्या तंबाखूच्या प्रयोगाला ( गुडगुडी ओढल्याचा अभिनय करते )

**विनायक:**—तुला काय वाटतं, मी खरोखरच गुडगुडी ओढतो म्हणून ?

**प्रभाकर:**—आम्हाला का फसवतो आहेस विनायक ! अरे तूं आत्तां गुडगुडी ओढत शिवाला हुकूम सोडत होतास ना—ते सारं बाबासाहेबांनीं ऐकलं, आणखीन् शिवा जीव घेऊन पळत आंत आला अन् मला सारं सांगितलन् ! म्हणून तर मी आलों घाईघाईनं इकडं !

**विनायक:**—म्हणजे ! प्रभाकर खरं सांगतो आहेस तूं हे ?

**ताई:**—खरं म्हणजे काय ! शिवाला विचार हवं तर !

**विनायकः**—गाढव आहे तो अगदीं !

**शिवाः**—( एकदम प्रवेश करून ) धनी, हा बरा नाय् ! सगलां भलता भलता बोललांव तुमी अन् वखुत आला तसा गाडव ठरवता मला !

**विनायकः**—पण मला सूचना तर द्यायची होतीस !

**शिवाः**—तुमी आगिनगाडीसारखं बोलत सुटलांव—अवसर तर गावाया होवा मान्साला !

**विनायकः**—बरं ! बरं ! फार शहाणा आहेस ! जा काम कर आपलं !

[ शिवा पुटपुटत आंत जातो. विनायकचे मित्र कृष्णा आणि शंकर प्रवेश करतात. त्यांना पाहून विनायक खोलीच्या बाहेर येतो. ताई शिवाला हांक मारून जास्त कप आणायला सांगते व केट्ल बाहेरील टेबलावर ठेवते. सर्वजण बसतात व थोड्या वेळानें कपबशा आणल्यावर पुढील भाषणें चालू असतां ताई सर्वांना चहा देते ]

**शंकरः**—चहा इतक्या उशिरां ! काल रात्रीं नाटकाला बिटकाला गेला होतास कीं काय ?

**विनायकः**—होय गेलों होतों खरा ! आलों जिवंत कसाबसा नाटकाच्या नायकाच्या हातून सुटून !

**कृष्णाः**—म्हणजे !

**विनायकः**—म्हणजे खरोखरच जिवंत सुटलों ! अरे नेहमींप्रमाणं नायकानं सर्वांना ठार मारण्याचा पैजेचा विडा उचलला होता—दुसरं काय ? तो बहाद्दर प्रेक्षकांच्यासमोर आल्यापासून तरवार म्यानांतून काढल्याशिवाय एक शब्द बोलला असेल तर शपथ ! नायक स्टेजवर आल्याबरोबर स्त्रियांचा गर्भपात झाला नाहीं तर तो नायक कसला !

**कृष्णाः**—हा असला नायक होता तरी कोण ?

**विनायकः**—शिवाजी ! इतका पराक्रमी दुसरा कोण असणार बुवा ! त्याच्या मनांत एकच कल्पना खेळतांना दिसली,

**“ कोण येतो तो पहातो मजसि माराया**
**कण्ठ त्याचा चिरून टाकिन कोप शमवाया ”**

**शंकरः**—अरे बापरे! बराच भयंकर प्रकार झाला एकूण! पण कायरे, मग बिचारी सईबाई! तिची तर अगदीं घाबरगुंडीच उडाली असेल त्याला पाहिल्याबरोबर!

**विनायकः**—छे! ती पतिव्रता घाबरते आहे म्हणतोस होय! अरे

**व्याघ्र सिंह भयानक**
**देखोनी भयचकित होती लोक**
**त्यांच्या भार्या निःशंक**
**तयापुढें खेळती**

**कृष्णाः**—तुझं म्हणणं काय विनायक? स्टेजवर नटानं ओरडूं नये तर काय करावं? मला तर शिवाजीचं काम फारच आवडलं!

**विनायकः**—ओरडूं नये कोण म्हणतो! चांगला शिमगा करावा! खूप सापडलाय् बिचारा शिवाजी तुमच्या सगळ्यांच्या तडाक्यांत! अरे तरी बरं तुम्ही अजून उर्दु नाटकं पाहिली नाहींत! मी एका नाटकाला गेलो होतो, त्यांत नायिकेच्या बापाचा खून कांहीं गैरसमजानं नायकानं केला होता, आणखी आपल्या भावी सासऱ्याचं मुंडकं घेऊन नायक सैतानासारखा स्टेजवर धिंगाणा घालीत फिरत होता!

[ हातांत डोकं घेतल्यासारखं दाखवून विनायक ॲक्टींग करून दाखवतो व पुढील भाषण करतो ]

"अय् खुदा मेरे हातसे यह क्या होगया उफ्–उफ्–उफ्–अब यह काला मूं मेरे प्यारीकू कैसा बताऊं!"

आतां गम्मत पहा अं! नंतर काय होतं, कीं नायिका येते आणखी स्वतःच्या बांपाचं तोडलेलं शीर पाहिल्याबरोबर, एकदम हुंदके देऊन रडत नाहीं, घाबरून जात नाहीं!—

**कृष्णाः**—म्हणजे मग करते तरी काय?

**विनायकः**—ॲक्टींग—अभिनय! (अभिनय करून दाखवतो) "कोन? तुम! यह क्या किया!! किसका सर? अब्बाजानका!! आऽ! आऽऽ!!"

(सर्वजण हंसतात)

**विनायकः**—नंतर पुढल्या अंकांत नायकाला शिक्षा होते, त्या वेळीं नायक स्वतःचा बचाव पुढील वाक्यांनीं करतो त्या वेळचा अभिनय बघा "एक झाडपर दो फूल होते है. एक शाहीन्शाके सरपे चढता है! और दूसरा जमीनमे मिलकर खाक होता है" ( विनायक प्रत्येक शब्दागणिक अभिनय करून दाखवतो )

**विनायकः**—मागं एकदां काय झालं कीं कॉलेजमध्यें हिंदी मुलांनीं उर्दूमध्यें हॅम्लेट नाटक केलं. हॅम्लेट स्टेजवर आल्याबरोबर त्यानं 'उफ् उफ् उफ्' करून घोड्यासारखी नाचायला जी सुरवात केली—ती शेवटच्या अंकांत विष पिऊन प्रेक्षकांच्या सुदैवानं—मरेपर्यंत कायम होती! खरोखर शोकपर्यवसायी नाटकानं इतका हास्यरस पूर्वी कधींच पिकवला नसेल! त्या दिवशीं खरी ट्रॅजिडी झाली स्वर्गात!

**कृष्णाः**—ती कशी काय ?

**विनायकः**—बिचारा शेक्सपिअर हॅम्लेटचं काम पाहून—शोकवायू होऊन—स्वर्गात दुसऱ्यांदा मेला!

( सर्वजण हंसतात )

**ताईः**—दादा...

**प्रभाकरः**—विनायक तुझा हा फाजिलपणा आटोपला म्हणजे मग......

**विनायकः**—अहो वशिष्ठ मुनि......

**प्रभाकरः**—तुझ्या कांहीं लक्ष्यांत आहे का? उषा आज—आत्तां येणार आहे म्हणून—( बायकोकडे वळून ) तिची आणखी तिच्या मैत्रिणीची स्नानाची तयारी कर बरं अगोदर!

**विनायकः**—थांबग ताई! कायरे ए! चार दिवस पाहुणा म्हणून आलास—तो बायकोच्या जिवावर आमचं घरच कार्बीज करून बसलास!—आणखी उषाचा धाक कोणाला घालतोस रे! मी तुला आणखी ताईला एकदाच सांगून टाकतो उषानं माझ्याकडून कोणत्याच तऱ्हेच्या पाहुणचाराची अपेक्षा करूं नये! फार काय मी तिला स्त्रीदाक्षिण्य सुद्धां दाखवायला तयार नाहीं!

**प्रभाकरः**—पाहूं आतां घोडामैदान जवळच आहे!

**ताई:**—शिवाय उर्मिळा बरोबर आहे तिच्या ! पाहूं दादा त्या दोघींच्या समोर टिकतो का ?

**विनायकः**—मला तूं कुकुबाळ समजूं नकोस ! उषा—आणखी तिची मैत्रीण—या दोघी आपल्या घरीं येण्यांत तुझा हात होता, आणखी प्रभाकर त्यांत सामील होता असा जर पुरावा मला मिळाला तर लक्ष्यांत ठेवा......

**ताईः**—काय करणार आहेस रे तूं माझं !

**प्रभाकरः**—यमू तूं अशी वर्दळीवर नको येऊस त्याच्याशीं. त्याचे निश्चय किती दिवस टिकतात तें मला ठाऊक आहे—आजपर्यंत यानं निदान शंभर वेळ प्रयत्न केला असेल सिगारेट सोडायचा, पण तेरड्याचा रंग तीन दिवस! आणखी आतां तर काय निकोटीनवर प्रयोग करण्याच्या नांवाखालीं हल्ली गुडगुडी सुरू केली आहे !

**ताईः**—आणखी कृष्णराव, आज आमच्या दादासाहेबांनीं काय थाप मारली ठाऊक आहे का बाबांच्या जवळ तुमच्या संबंधीं !

**कृष्णाः**—काय !

**ताईः**—( गुडगुडीकडे बोट दाखवून ) कीं ती गुडगुडी तुम्ही ओढत असतां म्हणून !

**कृष्णाः**—मी ! मी ! ! विनायक आतां बाबासाहेबांच्या समोर तोंड तरी दाखवायची सोय आहे का मला !

**विनायकः**—त्यांत काय आहेरे ! मी बाबांच्या जवळ थाप मारली तूं गुडगुडी ओढलीस म्हणून ! प्रसंगच आला तर तूं आपल्या बाबांच्याजवळ माझ्यासंबंधीं अशीच कांहीं तरी थाप मार म्हणजे झालं !

**शंकरः**—अहो महाराज ! तुमच्याशीं मैत्री करणं म्हणजे भयंकरच काम आहे मोटं—तुमचे सारे दुर्गुण आमच्या अंगाला चिकटायचे !

**विनायकः**—ए उगीच पिरपिर नका करूं असली ! अरे आपले सर्वांचे बाप म्हणजे काय लहान अर्भकं आहेत असं का समजतां तुम्ही ! आपण सिगारेट ओढणार—इराणी हॉटेलांत जाणार—खाऊं नये ते खाणार—या साऱ्या गोष्टी ते गृहीतच धरून चालतात मुळीं ! चला ! उठा ! चलो

ताईसाब—जाव, आपल्या कामाला लागा ! आम्ही बाहेर जाणार ! आणखी एक गोष्ट सांगून ठेवतो ! मी आत्तां बाहेर जाणार आहे ! खाणावळींत जेवणार आहे ! असा दुपार होऊन गेल्यावर घरीं येणार आहे—पण जर बाबांना या सान्या गोष्टींचा मागमूस लागला तर लक्ष्यांत ठेव ! ( उठतो )

**ताई:**—आपण बाबांच्यापासून कांहींएक लपवणार नाहीं रे बुवा !

**विनायक:**—ठीक आहे पाहून घेईन !

**प्रभाकर:**—विनायक, फाजीलपणा करू नको हं ! उषाचा किंवा उर्मिळेचा जर तूं अपमान केलास भलताच—

**कृष्णा:**—विनायक अरे मुख्य तर राहूनच गेलं—आज कॉलेज क्वार्टर्समध्यें येणार आहेस का तूं ?

**विनायक:**—कां कांहीं विशेष कार्यक्रम आहे कीं काय ?

**शंकर:**—हो ! त्यांत शंकाच नाहीं ! आमच्या वर्गातला तो वाटाणे तुला माहित आहे ना !

**विनायक:**—आठवत नाहीं बुवा !

**कृष्णा:**—आठवत काय नाहीं ?—त्या दिवशीं नाहीं मी तुला दाखवला—अरे तो डॅन्डी !

**विनायक:**—हं ! हं ! त्याचं काय ?

**शंकर:**—आज त्याची आम्ही खूप गम्मत करायची असं ठरवलं आहे !

**विनायक:**—गम्मत ती कशी काय ?

**कृष्णा:**—तुझ्या घरीं आज उषा आणखी उर्मिळा राहायला येणार आहेत ना ? त्याची बित्तंबातमी वाटाणेनं काढली आहे ! तसंच मागं तुमचं लग्न मोडलं ना त्या वेळीं सुद्धां पहिल्यानं बातमी त्यानंच आणली, आणखी ती बातमी ऐकून तो अगदीं बेहद्द खूष झाला !

**प्रभाकर:**—तो काय म्हणून ?

**शंकर:**—तीच तर मजा आहे ! त्याला वाटत होतं उषाचं आपल्यावर प्रेम आहे आणखी त्या तंद्रींत स्वारी धुंद असे, आणखी इतक्यांत तुमचं लग्न ठरल्याची त्याला बातमी लागली अन् बिचारा काळवंडला !

**कृष्णाः**—पण पुढं लेकानं काय करायला सुरवात केली, कीं तुमची एकमेकांचीं पत्रं मधल्यामधें पळवायचा अन् वाचून चिकटवून परत ठेवायचा—आणखी एकदां तर काय केलन् कीं तिच्या एकदोन पत्रांतल्या मजकुरांत तुझ्या नांवाचा उल्लेखही नाहीं असं पाहून ती पत्रं त्यानं आपल्याजवळ ठेऊन घेतली, अन् मधून मधून तो तीं पत्रं लोकांना आपल्या अन् तिच्या प्रेमाची खूण म्हणून दाखवतो सुद्धां !

**विनायकः**—खरं सांगतो आहेस तूं हे कृष्णा !

**कृष्णाः**—मला खोटं सांगायचं कारण ?

**शंकरः**—हवा तेवढा पुरावा जमवून देईन मी त्याच्या स्वतःच्या तोंडून—माझ्यावर त्याचा फार विश्वास !

**प्रभाकरः**—( शांतपणें ) ओळख करून घेण्यासारखा दिसतो आहे हा प्राणी !

**विनायकः**—( संताप आंवरून ) बरं मग तुमचं म्हणणं काय पुढं ?

**कृष्णाः**—आज तुझ्या घरीं उषा पुनः येणार म्हणून तो घाबरला आहे—आणखी खरी बातमी काढण्याची त्याला एकसारखी चुटपूट लागून राहिली आहे !

**शंकरः**—तेव्हां आम्ही त्याला अशी थाप मारणार कीं तुझं उर्मिळेशीं लग्न जुळवण्याकरतां ती इथं येते आहे ! अन् वास्तविक तिचं स्वतःचं वाटाणेवरच—खरं प्रेम आहे !

**कृष्णाः**—अशी थाप मारून आम्ही त्याला इथं आणणार—अन् तूंही आम्हाला सामील झालास तर चांगला बनवून देऊं तोफेच्या तोंडी अन् काय !

**प्रभाकरः**—तोफेच्या तोंडी ! ते कसं काय ?

**कृष्णाः**—तुम्हाला उर्मिळेची कल्पना नाहीं प्रभाकरपंत ! ती जवळ असतांना जर आपण युक्तीनं वाटाणेला उषाकडे प्रणययाचना करायला पाठवूं शकलो तर बहार उडेल नुसती ! नुसत्या ठिकऱ्या !

**प्रभाकर**—मला कांहीं अजून पटत नाहीं तें ! तुझं काय मत आहे विनायक ?

**विनायकः**—ती गोष्ट सध्यां बाजूला राहूं द्या—पण माझ्या मनांत त्याला भेटायची मात्र फार इच्छा झाली आहे. माझी उषेला लिहिलेली दोन अत्यंत महत्त्वाची पत्रं गहाळ झालीं आहेत ती जर वाटाणेनं चोरलीं अशी माझी खात्री झाली तर—ठीक आहे. कृष्णा! त्याला वाटेल ती थाप मारून इथं तर आण, मग त्याला प्रत्यक्ष पाहिल्यावर काय करायचं तें ठरवूं!

**कृष्णाः**—
**शंकरः**— } आम्ही जातो तर आतां? ( जाऊं लागतात )

**कृष्णाः**—( उलटून ) चार वाजतां त्याला आम्ही अवश्य आणतो आं!

**विनायकः**—( विचारांतून जागा झाल्यासारखें करून ) ठीक आहे!

**प्रभाकरः**—कृष्णराव मला तुमच्याशीं थोडं बोलायचं आहे!

**कृष्णाः**—चला!

( प्रभाकर, कृष्णा, शंकर बोलत बाहेर जातात )

[ बाहेर जाण्याचा पोषाख करून बाबासाहेब खालीं उतरतात. त्यांची चाहूल लागतांच विनायक आपल्या खोलींत जातो ]

**बाबा०ः**—शिवा,—ए शिवा!

**ताईः**—( येऊन ) काय पाहिजे बाबा? शिवाला बाजारांत पाठविला आहे!

**बाबा०ः**—जोडे कुठे आहेत माझे? कद्धी जाग्यावर नसायचे!

**ताईः**—( पाहून, पलीकडे बोट दाखवून ) ते काय, तिथं आहेत!

**बाबा०ः**—आज नवीनच जागा काढलीन्! म्हातारचळ लागलाहे कीं काय त्याला! ( जाऊं लागतात )

**ताईः**—( हलक्या आवाजांत ) बाबा!

**बाबा०ः**—( परतून ) काय?

**ताईः**—( हळूच भीत भीत विनायकाचे खोलीकडे पहात ) बाबा! दादा किनई, उषा येण्याच्या सुमारास, बाहेर पडणार आहे; बहुतेक आर्यनिवासांत जेवणार आहे, अन् दोनप्रहरीं घरीं येणार आहे!

**बाबा०ः**—असं? ठीक आहे; आलंय् लक्षांत माझ्या काय करायचें तें! तूं काळजी करूं नको.

[ विनायक हळूच माजघराच्या दाराशीं येऊन उभा रहातो ]

**ताई:**—( हलक्या आवाजांत ) पण बाबा मी तुम्हाला सांगितलं, हें दादाला कळवूं नका बर का ?

**बाबा०:**—बरं, बरं. ( जातात )

**विनायक:**—( पुढें येऊन ) काय पुत्री ! पित्याशीं कसलं रहस्य-कथन चाललें होतं ?

**ताई:**—पुत्र तिरशिंगराव निघाले, तेव्हां म्हातारपणीं बाबांना पुत्रीशिवाय—

**विनायक**—अन् जावयाशिवाय् ! दुसरं कोण आहे जिव्हाळ्याचं ! बरं, जावई तरी काय, नुसता दैववशात् घरांत आलेला !

**ताई:**—दैववशात् ! !

**विनायक:**—दैववशात् नाहीं तर काय ग ? तूं निवडलास, अन् त्यामुळें प्रभाकरशी तुझं लग्न झालं असं थोडेंच आहे ! आम्हीं जो मनुष्य निवडला, त्याच्याशी चट्दिशी लग्न करायला तयार झालीस ! प्रभाकराच्या ऐवजीं आणखी दुसरा कोणी, सोम्या गोम्या रेम्या डोक्या निवडला असता तरी तूं मुकाट्यानं त्याच्याशीं लग्न लावलं असतस !—बाकी आम्ही सुद्धां शहाणे ठरलों नाहींच ! शेवटी जावई निवडला, तो निघाला—वेडाच !

**प्रभाकर:**—( प्रवेश करीत ) अरे, कोण वेडा ?

**ताई:**—आपलंच वर्णन चाललं होतं !

**प्रभाकर:**—माझं ? मी वेडा ! ! ( हंसत ) तो कसा काय ?

**ताई:**—विचारा दादालाच ! ( जरा रोषानं आंत जाते )

**प्रभाकर:**—किती चिडवतोस रे तिला आज काल !

**विनायक:**—महा डांबिस झाली आहे ती ! अरे अत्ता बाबाशीं कांहीं तरी खलबतं करीत होती. मला वाटतं, उषा अन् उर्मिळा यांच्यासंबंधीं असावीं कांहींतरी !

**प्रभाकर:**—हो, विनायक बरी आठवण झाली. पुष्कळ दिवस विचारीन विचारीन म्हणतो आहे मी तुला—पण विसरून जातो. मला असं आठवतं, कीं

मागें तूं उर्मिळेसंबंधीं फार बोलत असस—अन् आता या वर्षांत पहातों तो उषाशीं दोस्ती ! हें आहे तरी काय गौडबंगाल !

**विनायकः**—सांगीन मी तें तुला स्वस्थपणानं केव्हां तरी.

**प्रभाकरः**—बरं पण एवढं तर निदान सांगशील कीं नाहीं, कीं तुझ्या मनांत उषासंबंधीं खरोखरच का इतका तिरस्कार उत्पन्न झाला आहे ?

**विनायकः**—किती वेडा आहेस तूं प्रभाकर ! उषा कोणाच्याही मनांतून उतरण्यासारखी का मुलगी आहे ? मला राग आला आहे तो तिच्या परावलंबी-पणाचा !

**प्रभाकरः**—परावलंबीपणाचा ? तो कसा काय ?

**विनायकः**—नानासाहेब उषाला एखाद्या आय्. सी. एस्. च्या गळ्यांत बांधायला तयार झाले याचं नाहीं मला इतकं आश्चर्य वाटत ! पण उषा काय लहान होती त्यांचं ऐकून घ्यायला !—कां कॉलेज सोडून घरीं गेली ती ?

**प्रभाकरः**—इथं येणारच आहे ती आज ! प्रत्यक्षच विचार म्हणजे झालं !

**विनायकः**—तिच्याशीं एक अवाक्षरसुद्धां बोलणार नाहीं मी !

**प्रभाकरः**—आपल्याला नाहीं बुवा तुझं वागणं पटत हें ! अन् शिवाय तुझी मतं कांहीं असलीं तरी तुला त्यांच्या तैनातींत हें राह्यलंच पाहिजे थोडा वेळ तरी ! कारण दुपारीं मला एखाद्या तासाकरतां घरीं जावं हें लागणारच...

[ उषा व उर्मिळा प्रवेश करतात. उषाचें वय सुमारें २१–२२ वर्षांचें असून ती अंगानें सडपातळ आहे—स्वभाव थोडा रागीट व मानी, विनाकारण जास्त बोलण्याची नावड—परंतु विनायकावर प्रेम असल्यामुळें व तिच्या चुकीनें त्या उभयतांचें लग्न मोडलेलें असल्यामुळें—किंवा जगाचा तसा समज असल्यामुळें—ती विनायकाशीं बोलण्याकरितां उत्सुक. तिचे कपडे फॅशनेबल व मौल्यवान.

तिच्या मागोमाग तिची मैत्रीण उर्मिळा प्रवेश करते. तिचें वय २५–२६, बांधा उंच, कपडे नीटनेटके व मौल्यवान पण एकंदर पेहेरावांत भडक रंगाचा अभाव आणि फॅशन कमी. मोठ्या इस्टेटीची एकटी व स्वतंत्र मालकीण; वर्तन कोणत्याही तऱ्हेनें बेजबाबदारपणाचें नसलें तरी

वेळच आली तर भांडाभांडींत माघार न घेणारी! बी. एस्सी. होऊन एम्. एस्सी. चा अभ्यास करीत असलेली—वाचन अतिशय दांडगें ]

**उर्मिळाः**—आमचं सामान आणवण्याची व्यवस्था कराल का?

**प्रभाकरः**—हो हो! आलांत का! शिवा!! ए शिवा!!

[ विनायक आपल्या खोलींत निघून जातो ]

**शिवाः**—जीऽ ( येतो )

**प्रभाकरः**—जा बाहेरून बाईंचं सामान घेऊन ये!

**उर्मिळाः**—( पैशाचं पाकीट त्याच्याकडे करून ) अन् हे घे! गाडीवाल्याला पैसे दे याच्यांतून!

**प्रभाकरः**—( घाईघाईनें पुढें होऊन ) छे! छे! आपण त्याची नका काळजी करूं! मी ती सारी व्यवस्था करतो!

[ प्रभाकर जातो. ताई प्रवेश करते ]

**ताईः**—आल्यात कां एकदाच्या बायांनो! आणखी हें काय? दादा कुठं गेला!

**उर्मिळाः**—( खोलीकडे बोट दाखवून ) आंत.

[ विनायक कपडे घालून बाहेर येतो ]

**उषाः**—( सरळ विनायकापर्यंत जाऊन तो बाहेर जायला निघाला आहे या गोष्टीकडे दुर्लक्ष करून ) गेल्या तीन चार महिन्यांत मी आपल्याला निदान दहा वीस पत्रं तरी पाठविली असतील—त्यापैकीं एकाचं सुद्धां उत्तर द्यायला वेळ नाहींना सांपडला आपणाला!

**विनायकः**—तुझ्या पत्रांना उत्तर? खरोखरच तुला उत्तराची अपेक्षा होती?

**उषाः**—( संतापून ) अपेक्षा! छे! कधींच नव्हती! उगीच वेळ जात नव्हता ...

**ताईः**—माझं असं मत आहे दादासाहेब, कीं जेव्हां एखादं मनुष्य दुसऱ्याला पत्र लिहीतं त्या वेळीं त्याला त्याच्या उत्तराची अपेक्षा असते!

[ प्रभाकर ऐकत ऐकत प्रवेश करतो. शिवा सामान घेऊन येतो व आंत जातो ]

**प्रभाकरः**—अर्थात्च. पण ज्याला तें पत्र लिहीलं आहे तें माणूस शहाणं असलं तर !

**विनायकः**—अहो ! विद्वत्ता नका लढवूं बायकांच्या समोर !

**ताईः**—( थट्टेनें ) खरंच कीं दादा, तुझी ओळख करून द्यायची विसरलेच मी ! किती मी गांवढळ ! ही माझी मैत्रिण उर्मिळा—तुझ्यापेक्षां सुद्धां जास्त वाचन आहे तिचं ! अन् ही उषा—एक वर्ष लग्नापायीं वाया गेल्यामुळं इंटरच्या क्लासांतच अडकून पडली आहे अजून !

**विनायकः**—( उर्मिळेला व उषेला अगदीं नवीन ओळख झाल्यासारखा नमस्कार करून ) आपली उभयतांची ओळख झाली ! फार आनंद झाला !

**उर्मिळाः**—( संथपणें ) गेल्या दोन चार वर्षांत आपणाला कांहीं चमत्कारिक मेंदूचा विकार झाला होता ?

**विनायकः**—मेंदूचा विकार !

**उर्मिळाः**—नाहीं म्हट्लं इंटरच्या क्लासमध्यें आपण फिजीक्सच्या वर्गात पार्टनर्स होतो, ही गोष्ट अगदीं विसरलेले दिसतां आपण—म्हणून विचारलं.

**विनायकः**—( कपाळाला आठ्या घालून ) बोलीन मी या विषयावर पुढं मागं तुमच्याशीं ! ( उषेकडे वळून ) आपल्या मनांत माझ्याशीं आणखी कांहीं बोलायचं आहे !

**उषाः**—( संतापानें मान उडवून ) कांहीं नाहीं !

**विनायकः**—नाहीं ? आणखी कांहीं माझी खरडपट्टी काढायची असली तर काढा ! बायकांची जात आहां !—तेव्हां तुम्हाला अगदीं स्वतंत्र अधिकार आहेत या नव्या युगांत—बोलण्याचे न् वागण्याचे !

**ताईः**—दादा !

**विनायकः**—अग तूं सुद्धां बायकोचीच जात !—तूं सुद्धां यांची कड घ्यायचीस !

**प्रभाकरः**—विनायक असा...

**विनायकः**— आपण सुद्धां त्यांच्यातलेच एक ! ठीक आहे घाला गळ्यांत गळे !

( बाहेर जाऊं लागतो )

**उर्मिळाः**—( वरील भाषणें चालू असतां कमरेवर हात देऊन विनायकाकडे एकसारखी नजर रोखून पहात ) आपण शोपेनहॉर वाचला आहे वाटतं अगदीं अलीकडे ?

**विनायकः**—( औपरोधिक आवाजांत ) आपण पुष्कळच वाचलं आहे हें मला ठाऊक आहे ! आणखी जें जें वाचलं आहे त्याचा दुरुपयोगही आपणाला छान करतां येतो !

**उर्मिळाः**—( त्याच्या टोल्याकडे दुर्लक्ष्य करून ) आपलं भाषण आणखी वर्तन फक्त पुस्तकं वाचून ठरवून ठेवल्यासारखं दिसतं, म्हणून आपलं सहज विचारलं, कीं आपण शोपेनहॉर वाचला आहे कीं काय नुक्ताच ! कारण तो पक्का स्त्रीद्वेष्टा होता !

**विनायकः**—स्त्रीद्वेष्टा व्हायला पुरुषाला तशीच कारणंही असतात हें विसरतां आहांत आपण ! स्वतः आपण स्ट्रिन्डबर्ग वाचला असेलच !

**उर्मिळाः**—अहो ज्यांनीं मनू वाचला आहे त्यांना स्ट्रिन्डबर्ग कशाला वाचायला पाहिजे ! राजर्षि मनू महाराजांनीं स्त्रियांची जितकी निंदा केली आहे, आणखी त्यांचा समाजांतला दर्जा जितका उतरवून ठेवला आहे, तितका दहा स्ट्रिन्डबर्ग आले तरी त्यांना का साधणार आहे ! पण तें असो ! आपण जेव्हां इन्टर सायन्सच्या क्लासमध्यें होतों, आणखी तुम्ही एका मुलीवर प्रेम करीत होतां—आठवतं का तुम्हाला तें ?

[ विनायक आश्चर्यानं थक्क होऊन पहात राहतो. उषा संतापाची नजर विनायकाकडे फेंकते ]

**ताईः**—दादाचं प्रेम होतं तरी कोणाकोणावर ?

**प्रभाकरः**—ही नवीनच बातमी कळते आहे आज !

**विनायकः**—माझ्या स्त्रीदाक्षिण्यामुळं बराच गैरसमज करून घेतलेला दिसतो आहे तुमच्या त्या मैत्रिणीनं. ठीक आहे आपण आलांच आहां आमच्या घरीं आतां, तेव्हां होईलच भेट कधीं कधीं.

[ बाहेर निघून जातो ]

**प्रभाकरः**—उर्मिळाताई, उषाताई आमच्या विनायकाचा स्वभाव जरा तऱ्हेवाईक आहे—तऱ्हेवाईक म्हणण्यापेक्षां तो तसा असल्याचा देखावा करतो त्याला बिलकुल घाबरूं नका !

**उर्मिळाः**—छे ! छे ! ! आम्ही त्यांना मुळींच घाबरत नाहीं. शिवाय विनायकरावांना आम्ही नव्यानं का ओळखतों आहोंत ? स्वारी उषाच्या एकाही पत्राला उत्तर देत नाहीं असं उषानं मला सांगतांच सारा प्रकार ओळखून मीं उषाला ताबडतोब बजावलं कीं ' बाईग, तुझ्या मनांत जर खरोखरच त्यांच्याशीं लग्न करायचं असेल तर अशी मुळुमुळू रडत घरीं बसूं नकोस. सरळ जाऊन त्यांची भेट घे, आणखिन् टाक एकदां खुलासा करून या प्रकरणाचा !

**ताईः**—अस्सं ! ही आपली कारवाई आहे तर एकूण ! तरी म्हटलं, उंबराच्या फुलासारख्या दुर्मीळ झालेल्या उर्मिळाताई एकाएकीं कशा उगवल्या आज !

**उर्मिळाः**—अग, मी येणारच नव्हतें; पण उषानं परोपरीनं आग्रह केलान् म्हणून आलें झालं ! शिवाय एक गंमत कुठं ठाऊक आहे तुम्हाला अजून ?

**ताईः**—काय ?

**उर्मिळाः**—अग उषानं बापाशीं भांडून हें लग्न मोडलं आहे, अन् विनायकरावांना कांहीं तें ठाऊक नाहीं.

**प्रभाकरः**—असं जर होतं तर मग उषानं विनायकाला ताबडतोब कां नाहीं कळवलन् हें !

**उषाः**—एका सुद्धां पत्राला जर माझ्या जबाब नाहीं त्यांच्याकडून—तर मग काय करायचं माणसानं !

**ताईः**—मग आतां सांग !

**उषाः**—आतां ! आहेत वाटतं ते इथं.

**प्रभाकरः**—उषाताई आपण या विषयावर दोनप्रहरीं बोलूं ! यमू तूं यांची व्यवस्था कर चहाची अन् स्नानाची—तोंपर्यंत मी हा माडीवरून आलोंच.

[ जातो ]

**ताई:**—अन् काय ग उर्मिळाताई, मघाशीं, तें काय ग म्हणालीस तूं ? दादाचं एका मुलीवर प्रेम होतं म्हणून ! ती मुलगी म्हणजे तूंच तर नाहींस !

**उर्मिळा:**—किती वेडी आहेस ग तूं ? अग उषाच्या बापानं नुसती तिला दुसऱ्या एका गृहस्थाला दाखवायला घरीं नेली तर त्याबद्दल ते इतके संतापतात, आणखिन् उषाशीं पत्रव्यवहार बंद करतात ! म्हणून आमच्या जुन्या मैत्रीचा फायदा घेऊन दिला झालं टोला !

**ताई:**—पण उर्मिळाताई, प्रसंग दादाशीं आहे हें विसरत जाऊं नका बरं ! कारण तुमची 'बाउंडरी' तर त्याची 'ओव्हर बाउंडरी' ! बरं पण उशीर किती झाला ! चला बरं तुम्ही आंत. बाबा यायची वेळ झाली. अन् हें ग काय उषाताई ! असं रडवं तोंड नाहीं बाई आवडत आपल्याला !

**उर्मिळा:**—अग रडवीच आहे ती !

**ताई:**—रडवी नाहीं तर काय ! ( तिचे दोन्ही हात धरून ) हसतेस कीं नाहीं ग पोरी—हंसतेस कीं नाहीं !

[ उषा हंसण्याचा प्रयत्न करते पण डोळ्यांत अश्रू येतात ]

**ताई:**—( वाईट वाटून ) असं काय करतेस ग वेड्यासारखं—चल बरं आंत अगोदर. ( तिला व उर्मिळेला आंत नेण्याचा प्रयत्न करते )

**उषा:**—यमू, हें खरं कीं नाहीं ?

**ताई:**—काय ?

**उषा:**—कीं मी आलें म्हणून विनायकराव आतां बाहेर गेले !

**ताई:**—हो ! हो ! खरं...

**उर्मिळा:**—गेले म्हणून काय झालं, त्याच्यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं त्यांचं तुझ्यावर फारच प्रेम आहे म्हणून !

**उषा:**—( रागावून ) तें नाहीं मी तुला विचारलं ! ( शांतपणें ताईकडे वळून ) यमू तूं उर्मिळाताईची व्यवस्था कर स्नानाची—तोपर्यंत मी घरीं एक कार्ड टाकतें.

**ताई:**—ठीक आहे, आटप लवकर.

[ उर्मिळा व ताई आंत जातात. उषा विचारांत निमग्न होऊन स्वस्थ बसते. स्नानाच्या तयारींत असलेली उर्मिळा प्रवेश करते ]

**उर्मिळा:**—( हळूच तिच्या खांद्यावर हात ठेऊन प्रेमळपणानें ) हें काय! खचलीस वाटतं इतक्यांतच!

[ उषा कांहींच उत्तर देत नाहीं ]

हें असं कांहीं तरी होईल—हें मी तुला अगोदरच नव्हतं सांगून ठेवलं!! आणखीन् तूं कबूल सुद्धां केलं होतंस......

**उषा:**—उर्मिळाताई, हे सारं मला सुद्धां कळतं, पण वळत नाहीं त्याला मी तरी काय करूं! टागोरांची गीतांजली वाचली त्यावेळीं मला वाटलं मी श्रेष्ठ झाल्यें—परवां माझ्या नव्या बालकवींची ऐरण वाचली—

**उर्मिळा:**—बालकवि!

**उषा:**—अग हो! ज्या वेळीं त्यांनीं ती कविता लिहिली त्यावेळीं मी आज आहें त्यापेक्षां, ते खात्रीनं लहान होते! पण काय स्फूर्तिदायक आणखी तेजस्वी कविता लिहिली आहे त्यांनीं! ती कविता वाचतांच सर्व जगाचे आघात सहन करण्याची शक्ति आल्यासारखी वाटते.

[ स्वतःला नकळत 'ऐरण' म्हणावयास सुरवात करते ]

**घाव घालुनी पहा एकदां सोशिल सारे घण**
**माझ्या हृदयाची ऐरण!**
**दुःख येउनी कधीं हिच्यावर कपाळ घे फोडुन!**
**कण्हतसे शोक-गीत ऐरण.**
**हर्षबाल खिदळुनी करितसे स्वैर कधीं नर्तन;**
**नादती मंजुळ नृत्यस्वन.**
**प्रीतिदेवता लाथ हाणितां ध्वनी उठे भेदुन;**
**हळवा सूर घुमवि ऐरण.**

**कुणि कधीं येउनी घाला येथें घण;**
**सौंदर्य-ज्योतिचे उडतिल तेजःकण !**
**या अशा कणांचे गीत-हीर बनवुन,**
**घाव घालितां, हार हिऱ्यांचा तुम्हालाच अर्पिन !**
**असली माझी ही ऐरण !**

**उषा:**—( म्हणणें आटोपल्यावर ) उर्मिळाताई ऐरण वाचल्यापासून मला वाटत होतं कीं आपण मोठ्या झालों, आतां आपल्याला दुःख खचवूं शकणार नाहीं—पण बिचाऱ्या कवींचा शेवटीं पराभव झाला !

**उर्मिळा:**—अग हें नेहमीं असंच होतं ! आपण कांहीं तरी श्रेष्ठ वाचतो, अन् त्याबरोबर एकसारखा आपला विकास होत जातो—पुनः आयुष्यांतल्या कर्मकटकटींशीं संबंध आला कीं आपल्या या श्रेष्ठ भावनांना ओहोटी लागते—समुद्राची भरती आणि ओहोटी यांच्या फेऱ्यांत जशी पृथ्वी सांपडली आहे, तसे भावनांच्या या भरती-ओहोटींत आपण अडकून पडलों आहों ! चल चल ! आंत चल !—अन् सोडून दे हा सारा भागुबाईपणा !

**उषा:**—मी खचलें आहे असं का वाटतं तुला उर्मिळाताई ! ( दुःखानें ) मला हा अपमान सहन होत नाहीं त्याला मी तरी काय करूं ?

**उर्मिळा:**—अपमान ! वेडी रे वेडी ! चल आंत, चल पाहूं अगोदर—

[ उषा हळू हळू उठते—पडदा पडतो ]

---

# अंक २ रा

**दिवस तोच; वेळ दोनप्रहर ३॥ वा.**

[ **स्थळः**—पहिल्या अंकांतील स्थळालगतचा घरांतील आंतील भाग. विनायकाची खोली आतां प्रेक्षकांचे उजवे हातास दिसत असून खोली-मागून बाहेरच्या दालनाला जोडणारी पडवी उजव्या कोपऱ्याकडून दिसते. मध्यें झोंपाळा टांगला असून, बाजूला एक बांकवजा कोच व दोन खुर्च्या.

झोंपाळ्यावर उषा हातांत दिल्रुबा घेऊन बसली आहे. तिच्या शेजारीं उर्मिळा बसली आहे. समोरच आडव्या कोचावर प्रभाकर बसला आहे. दुपारचा चहा नुक्ताच आटोपला असून शिवा कप्‌बशा उचलून नेत आहे. ताई गात असून तिचें गाणें संपत आलें आहे ]

**उषाः**—( गाणें संपतांच हातांतील वाद्य खालीं ठेऊन, टाळ्या वाजवून ) वन्स्‌मोअर ! वन्स्‌मोअर ! !

**उर्मिळाः**—नो मोअर ! ताई, नको म्हणू ग पुन्हा ! ही लुच्ची मघा पासून म्हणायचं टाळत्याहे, आणि तूं आपली बावळटासारखी एक, दोन, तीन म्हणून मोकळी !

**प्रभाकरः**—उर्मिळाताई, खरं आहे तुमचें म्हणणं. उषाताई, म्हणा पाहूं अगोदर—

**उषाः**—आज किनई मला आग्रह करू नका कोणी. एक तर माझा गळा धड नाहीं आज; अन् अगदीं खरं सांगायचं म्हणजे मनच नाहीं माझं गाण्यांत आज !

**उर्मिळाः**—अग त्यावर मी उपाय सांगते ! शोकरसाचं म्हण.

**ताईः**—म्हणग ! किती आग्रह घेतेस !

**उषाः**—बरं बाई, तुमच्या मनासारखं होऊ द्या. ( हातांत दिल्रुबा घेऊन म्हणूं लागते )

**हें काय असें होई ! साशंक धपापे ऊर**
**डोळ्यांत जमे पाणी, डोक्यांत उठे काहूर**

**एकान्त गमे ठेवी, छातीवरती ओझें**
**अन्धार फिरे भोंती, गेला दुनियेचा नूर्**
**पाणी न कुठे साचे, हा जीव कसा वाचे**
**वाळूनि मदाशांचे जातात पहा अंकूर**
**हृत्संग तिचा किंवा मृत्यूच मिळो जीवा**
**थांबेल कधीं काळीं, त्यावीण न ही हुर्हूर ॥ १ ॥**

**प्रभाकरः**—म्हटलंत छान्, पण आपल्याला हीं शोकरसाचीं गाणीं नाहीं बोवा आवडत ! यमू तूं कोणचं ग म्हणत होतीस कीं, तें उषाला अगदीं उत्तम येतं म्हणून !

**ताईः**—( तर्जनीनें सर्वांना चूप अशी खूण करून ) दादासाहेब काय करताहेत तें पाहून येते जरा.

[ पडवींतून विनायकाच्या खोलीच्या मागच्या बाजूस जाते. इतक्यांत प्रेक्षकांच्या बाजूचा विनायकाच्या खोलीचा पडदा बाजूस सरून प्रेक्षकांस खोलीचा आंतील भाग दिसतो. ताई मागच्या खिडकींतून डोकावतांना दिसते. शिवा कपबशी नेण्याकरितां विनायकाच्या खोलींत येतो तोंच विनायक घरांत काय चाललें आहे त्याचा कानोसा घेत असलेला दृष्टीस पडतो—शिवा मनाशींच हंसतो व कपबशी उचलतो. कपबशीचा आवाज होतांच विनायक ढेंकूण पहात असल्याचा बहाणा करतो ]

**विनायकः**—शिवा ! तुझं लक्ष्य कुठं आहे आजकाल ! खोलींत इतके ढेकूण झाले ......

**शिवाः**—लक्ष ! कोनत्याबी आवावर नाय् धनी ! बराबर कामावरच हाय ! या खोलींत औषधालाबी ढ्येकून गावला तर मिशी काढून देईन !

**विनायकः**—शिवा !

**शिवाः**—जी.

**विनायकः**—तूं आतां संभावित घरांत चाकरी करायला अगदीं लायक नाहीं राहिलास !

**शिवाः**—जसा मालक तसा नोकर ! धनी ! तुमीच संभावितपना सोडून-श्यान् दिला ......

**विनायकः**—शिवा ! माझंही बाबांच्या सारखंच मत होत चाललं आहे ! आजपासून एक महिन्याची नोटीस देतो आहे तुला ! जा, दुसरा कांहीं रोजगार-धंदा बघ !

**शिवाः**—दोन इसा अन् पांच वर्स झाली धनी—योक दिवस पर न्हाई गेला या घरांत नोटीस मिलाल्या बिगर ! पन धनी मी सपष्टच इचारतो—अस चोरुन मारुन तिच्याकडं पघता घंटच्या घंट—तर मग मर्दावानी फुड होऊन—पिरतीनं तिचा हात धरुन उगडच सवाल टाका !

**विनायकः**—( संतापून ) काय सवाल टाका !

**शिवाः**—असा सवाल टाका, कि जनु कलगीतुऱ्याची लावनी !

**विनायकः**—फाजिल—मूर्ख नाहीं तर !

**शिवाः**—( त्याच्याकडे दुर्लक्ष करून ) तिला इचारा, 'कायग बया, इत्तं गानं न् बजावनं कशापाई चालवतियास् ?—हें काय कसबिनीचं घर हाय—का झागिरदाराचा वाडा हाय ! चल, माजी तुज्यावर पिरीत हाय. माझं पंचपरान कंठी आलं—डोल्यामंदी समदा जीव घालूनश्यान मी तुज्याकड पगतो. भाईर चांदनं पडल् म्हनूजी आक्षि तुजी आठवण होऊनशान् कांबरुनांत डोल्याला डोला लागत न्हाई—सकालच कोंबडं क्येकाट्ल, म्हन्जी मग वांईच तुझी मूरत चांदन्यावानी इरघलून जातीया—अन् डोला लागतुया—तर बाबासाब गोमितर घ्येऊन तैय्यार !

**विनायकः**—शिवा ! फाजिलपणा राहूं दे—वर जा, आणखी ती ढेंकूण डास मारायची पिचकारी घेऊन ये !

**शिवाः**—तुमास्नी न्हावतच नसल, उडवा खोली भर राक्येल अन् करा समद्या खोलीचा खराबा ! माझं काय जातया, आनूनशान् द्येतो हाव तर—पन तुमी काईपर खट्पट् करा, ही बया तुमची रानी होऊन्शान् या घरची मालकीन-बाई होऊन बसनार ! अन् गरीब शिवाला रोज नोटिस द्याया तिसरं मानूस येनार !

**विनायकः**—जा पाहूं तूं अगोदर !

[ शिवा जातो. ताई दिसते. विनायक लिहिण्याच्या सोंगाची बतावणी करायला सुरवात करतो. ताई येते ]

**ताई:**—काय दादासाहेब ! काय चाललं आहे ?

**विनायक:**—तायडे ! तूं फार फाजिलपणा चालवलास आहेस बरं का आज सकाळपासून !

**ताई:**—तो कसा काय ?

**विनायक:**—बाबा मला सकाळीं नेमके हॉटेलच्या दरवाज्याजवळ कसे भेटले ग ! त्यामुळं मला पूर्वीचा बेत रद्द करून घरीं उषाच्या आणखी उर्मिळेच्या पंक्तीला जेवायला बसावं लागलं ! आणखी ती उर्मिळा बाबांच्यावर आपल्या विद्वत्तेची छाप पाडते !—अन् बाबासुद्धां दोन तासांत तिचं एखाद्या कुकुबाळासारखं प्रत्येक वाक्य खरं मानायला लागतात ! आतां म्हातारपणीं लग्न नका करूं म्हणावं, म्हणजे मिळवली !

**ताई:**—( हंसत ) दादा काय भलतं भलतं बोलायला शिकला आहेस रे तूं ! ( समजावणीच्या स्वरांत ) अन् कायरे तिकडं माजघरांत सर्व मंडळी जमली आहेत, अन् तुला असं तुसड्यासारखं एकटं बाजूला रहाणं शोभतं का !

**विनायक:**—बरं बरं ! तूं नको अक्कल शिकवूस मला !

**ताई:**—ठीक आहे ! मलाही ठाऊक आहे बरं का दादासाहेब काय करायचें तें अशा वेळीं !

[ शिवा डांस मारण्याची पिचकारी घेऊन येतो ]

**ताई:**—शिवा ! काय रे हे ?

**शिवा:**—धाकट धनी माशा मारायची कामगिरी करनार हैत !

**ताई:**—( खुद्कन् हंसून विनायकाकडे तिरक्या नजरेनें पहात ) माशा मारण्याशिवाय उद्योग काय आहे त्याला !

**विनायक:**—शिवा ! जा इथून ! सहा महिनेपर्यंत माझ्या खोलींत पाऊल टाकलंस तर लक्ष्यांत ठेव !

**शिवाः**—अन् बाबासाब जर म्हंगाल कि 'शिवा! इन्या कुठं हाय' अन् मी म्हंगालो कि 'निजल हैत' अन् बाबासायब मंगाल 'बिगाडल्! प्वार बिगाडल्!'

**विनायकः**—( भडकून ) Get out! Get out! I say!

[ शिवा त्याचा हा खरोखरीचा संताप पाहून घाबरतो ]

**शिवाः**—माफ् करा धनी!—लई गाडवावानी बोलूनश्यान् गेलो मी!

**विनायकः**—( नरमून गोडीनं ) नाहीं! शिवा रागावलों नाहीं मी तुझ्यावर!

**शिवाः**—अगदीं खरं?

**विनायकः**—अगदीं खरं!

[ शिवा खुष झाल्यासारखें दाखवून बाहेर जातो ]

**ताईः**—( खुद्‌कन् हंसून ) नेहमीं माफी मागण्याचा प्रसंग तुझ्यावर दादा!

**विनायकः**—Get out, Get out, I say!

[ ताई हंसत बाहेर पडते व मंडळींत मिसळते ]

**प्रभाकरः**—कायग यमू! भडकवलास वाटतं! ओरडला कां येवढ्यानदां?

**ताईः**—( हंसत हळू आवाजांत ) गाणं ऐकत असतांना पकडला म्हणून चिडली स्वारी, दुसरं काय! तुम्हाला तें दुसरं गाणं ऐकायचं होतं ना!—गम्मतच करूं. ( लबाडीनें विनायकाच्या खोलीकडे नजर फेंकून ) उषाताई! 'दिल्‌रुबा' म्हणग एकदा!

**उषाः**—यमू!

**ताईः**—अग म्हणग! दादानं लिहीली असली ती कविता म्हणून काय झालं!—त्याची कांहीं भिती आहे कीं काय आपल्याला! बारा आण्याला मिळत तें पुस्तक बाजारांत!

**प्रभाकरः**—विनायकाची आहे म्हणून का भिता म्हणायला! त्याला जरा येऊं तर द्या Protest करायला, म्हणजे आयताच सांपडेल आपल्या तडाक्यांत!

**उर्मिळाः**—तसं नव्हे, उषा कां नाहीं म्हणत ठाऊक आहे का ती कविता?

**प्रभाकरः**—कां बरं!

**उर्मिळाः**—अहो एकदां काय झालं, कीं उषा दिल्‌रुबा घेऊन वाजवायला बसली होती. अन् विनायकराव आले एकाएकीं आंत—अन् एकदम त्यांच्या तोंडून वाल्मिकीसारखा त्या कवितेचा पहिला चरण बाहेर पडला "थांब थांब बाले आतां ठेव दिल्‌रुब्याला" ( सर्वजण हंसतात. उषालाही किंचित् हंसू येतें पण ती संतापल्यासारखं दाखवते ) अन् मग दोघांही Loversनीं मिळून ती कविता पुरी केली !

**उषाः**—( संतापून ) उर्मिळे ! मी आज संध्याकाळीं घरीं जाणार !

**उर्मिळाः**—अन् नानासाहेब बाहेरगांवीं गेले आहेत असा या लोकांना पाठवलेला निरोप खोटा पाडायचा कीं काय ?

**प्रभाकरः**—म्हणजे !

**ताईः**—मी तेव्हांच ओळखला होता बरं का उर्मिळाताई तुझा हा डाव !

**प्रभाकरः**—उषाताई म्हणा हो !

**उषाः**—( म्हणते )

**"थांब ! थांब ! बाले आतां ठेव दिल्‌रुब्याला**
**सूरसागराच्या लाटा बुडविती जिवाला ॥ थांब० ॥**
**विश्व शांत रजनी शांत, चांदणेंहि फुललें शांत,**
**शांतीचेंच घुमतें का हें गीत दिल्‌रुब्यांत ?**
**दिव्य तुझ्या संगीताची साथ आणि त्यांत**
**देहभान सुटलें आतां, ठेव दिल्‌रुब्याला !**
**हृदयाच्या तारा माझ्या होति एकतान;**
**एकसुरीं लागुनि गेलें सृष्टिचेंही गान !**
**जीव उडे दिव्यीं करुनी नादमय विमान**
**धरा स्वर्ग मिळुनी गेलीं सूरसागराला"**

[ कविता संपत असतां ताई हळूंच उठून विनायकाच्या खोलींत डोकावून पहाते तों विनायक दरवाजाला कान लावून ऐकत असलेला तिच्या दृष्टीस पडतो. ताई खोकते. विनायक आपण पिचकारी उडवीत

आहों व डांस मारीत आहों असा बहाणा करतो. इतक्यांत बाहेर जाण्याच्या पोषाखांत बाबासाहेब एकाएकी माडीवरून प्रवेश करतात. त्यांच्या अंगांत पांढरा शुभ्र अंगरखा असून डोक्याला अस्सल ब्राह्मणी जरीचा रुमाल आहे. अंगावर उपरणें; पायांत जोडा अर्थात्च नाहीं. बाबासाहेबांस पहाताच त्यांचा मान ठेवण्याकरतां गाणें बजावणें थांबतें व प्रभाकर खेरीज सर्वजण उठून जातात ]

**बाबा०:**—प्रभाकरपंत ! जरा उषेला इकडं पाठवा !

**प्रभाकर:**—बरं ! ( जातो )

[ उषा येते, व सरळ बाबासाहेबांपर्यंत येऊन उभी राहते ]

**बाबा०:**—उषा ! काय सुरेख गाणं म्हणतेस तूं ! ( उषा बोलत नाहीं असं पाहून ) कोणापासून शिकलीसग ती कविता !

**उषा:**—( विनायकाच्या खोलीकडे पाहून ) ही कविता विनायकरावांची !

**बाबा०:**—विन्या—विनायकाची आहे ही कविता !

**उषा:**—हो !

**बाबा०:**—अस्सं ! ( एकदम् विषयाला हात घालीत ) कायग ! एवढा आय्. सी. एस्. निवडून काढला तुझ्या बापानं—मग अगोदर मागणी घालून शेवटीं लग्न कां मोडलंन त्यानं !

**उषा:**—( शांतपणें ) त्यांनीं नाहीं मोडलं—मी मोडलं तें लग्न !

**बाबा०:**—( एकदम झोंपाळ्यावर बसून ) तूं ! तें काय म्हणून !

**उषा:**—( खालीं मान घालून ) आमचं लग्न अगोदरच ठरलं होतं म्हणून !

**बाबा०:**—मुली ! तूं मला अगोदरच कां नाहीं कळवलंस हें !

**उषा:**—( विनायकाच्या खोलीकडे बोट दाखवून ) मी त्यांना पुष्कळ पत्रं पाठवली. पण त्यांतल्या एकाही पत्राला उत्तर नाहीं दिलं त्यांनीं !

**बाबा०:**—बरं तूं जा अं ! आणखीन् उर्मिळाताई अन् प्रभाकरपंत यांना पाठव जरा इकडं !

[ उषा जाते. उर्मिळा व प्रभाकरपंत येतात ]

**बाबा०:**—उर्मिळाबाई ! तुम्हाला माहीत होतं हें ?

**उर्मिळा:**—काय ?

**बाबा०:**—बापानं ठरवलेलं लग्न उषानं मोडून टाकलं म्हणून ?

**उर्मिळा:**—हो !

**बाबा०:**—( अर्धवट आपल्याच मनाशीं ) अन् उषानं विनायकाला बरींच पत्रं पाठवलीं तरी त्यानं त्यापैकीं एकालासुद्धां उत्तर धाडलं नाहीं, हेंही खरं !

**उर्मिळा:**—हो, तेंही खरं !

**बाबा०:**—प्रभाकरपंत—हा पोरगा बायक्या आहे कीं काय ?

**उर्मिळा:**—पुस्तकांत वाचून ठरवलं आहे त्यांनीं कीं आपण लग्न करणं योग्य नव्हे म्हणून !

**बाबा०:**—बावळट आहे झालं ! बरं, प्रभाकरपंत मी बाहेर जाऊन येतो—तोंपर्यंत विनायकाला सांगा कीं जर ताबडतोब "उषाशीं लग्न करायला मी तयार आहे" असं मला आपण होऊन येऊन सांगितलं नाहींस, तर घरांतून हांकून देईन !

**प्रभाकर:**—माझ्या मनांत एक कल्पना घोळते आहे. ती जर यशस्वी झाली तर विनायकाचं मन आपणाला आपोआपच कळेल उद्यांपर्यंत !

**बाबा०:**—ठीक आहे, उद्यांपर्यंत वेळ द्या त्याला—तोपर्यंत जर त्यानं आपला निश्चय पक्का केला नाहीं, तर मग मी पाहीन काय करायचं तें !

[ बाबासाहेब जातात ]

**उर्मिळा:**—काय कल्पना घोळते आहे तुमच्या मनांत ?

**प्रभाकर:**—कल्पना अशी कीं, उषाच्याच वर्गांत वाटाणे नांवाचा एक मुलगा आहे. त्यानं विनायकाची उषाला आलेली पत्रं मधल्यामधें पळवली आहेत.

**उर्मिळा:**—वाटाणे ! मला माहीत आहे तो ! नेहमी बायकांच्या पुढं पुढं करीत असतो तो ! त्याचं काय ?

**प्रभाकर:**—कृष्णा आणखी शंकर त्याला अत्तां घेऊन इथं येणार आहेत !

**उर्मिळा:**—तें कशाला ?

**प्रभाकरः**—विनायकाची त्याची ओळख करून द्यायला.

**उर्मिळाः**—ती कशाकरतां !

**प्रभाकरः**—तुम्ही उषाला आणखी यमूला सांगणार नाहीं ?

**उर्मिळाः**—छेः !

**प्रभाकरः**—वाटाणेला उषाची प्रणययाचना करायला पाठवावा असा त्यांचा बेत आहे !

**उर्मिळाः**—त्याचा फायदा ?

**प्रभाकरः**—त्यांच्या मनांत गुसती गम्मत करायची आहे, त्याची फजिती उडवायची आहे. पण आपल्याला फायदा असा कीं या प्रकारांत विनायकानं जर का पुढाकार घेतला, तर आपण त्याच्या भोंवतीं गिल्ला करायचा, कीं तुझ्या या गाढवपणामुळं उषाताई वाटेल त्या विद्यार्थ्यांबरोबर flirting करते, असा तिच्या नांवाचा गांवांत बभ्रा सुरू झाला आहे—अन् जर तूं तिच्याबरोबर ताबडतोब लग्न केलं नाहींस...

**उर्मिळाः**—वा ! वा ! ! यानं तर स्वारी उलटी गरम व्हायची !

**प्रभाकरः**—तुम्हाला काय वाटतं विनायक खरोखरच उषाच्या हातून निसटण्याचा संभव आहे ?

**उर्मिळाः**—नाहीं—तसं नाहीं वाटत.

[ उषा व यमू प्रवेश करतात ]

**प्रभाकरः**—( हळूच ) या दोघींना पत्ता नाहीं लागू द्यायचा बरं का !

[ उर्मिळा मानेनं 'हो' म्हणते ]

**ताईः**—काय गुजगोष्टी चालल्या आहेत उर्मिळाताई—कांहीं कट चालला आहे वाटतं !

**प्रभाकरः**—छे ! कट कसला ! !

**ताईः**—मला कळतं बरं का सारं !

**उर्मिळाः**—हो ! हो ! कट चालला आहे ! ( प्रभाकरपंतास ) चला आपण वरच्या दिवाणखान्यांत बोलूं आणखी यावर !

[ प्रभाकरपंत व उर्मिळा जातात. उषा आणखी ताई थक्क होऊन त्यांच्या जाण्याच्या वाटेकडे पहातात ]

**उषाः**—( भानावर येऊन ) अग उर्मिळेचं नेहमीचंच आहे तें—जिकडे जाईल तिकडे पॉप्युलर होते ती !

**ताईः**—होईना, मी कांहीं डरत नाहीं.—पण उषाताई यांचा कांहीं तरी कट चालला आहे बरं का तुझ्यासंबंधीं !

**उषाः**—माझ्यासंबंधीं !

[ ताईला एकदम आठवण होऊन तिच्या डोळ्यांत मिस्कीलपणाची चमक मारते; ती हळूच विनायकाच्या खोलीकडे पहाते ! ]

**ताईः**—उषा, ही आल्येच मी हं ! ( विनायकाच्या खोलीकडे जाऊन ) दादा ! इकडं तुला हांक मारायचं बरं का !

**विनायकः**—( पुढें येऊन ) कोण प्रभाकर हांक मारतो आहे ! तो कशाला ?

**ताईः**—तें मलारे काय माहीत ?

[ एकदम सरळ निघून जाते. विनायक खोलींतून बाहेर येऊन पहातो, तों बाहेर उषाशिवाय कोणीच दिसत नाहीं ]

**विनायकः**—( गोंधळून ) प्रभाकर कुठं गेला !

**उषाः**—वर उर्मिळाताईशीं बोलताहेत !

**विनायकः**—अस्सं ! ( जाऊं लागतो )

**उषाः**—म्हट्लं...

**विनायकः**—( उलट्न रोषानं ) काय ?

**उषाः**—कांहीं नाहीं !

**विनायकः**—दिल्रुबा मुद्दाम म्हट्लास नाहीं तूं आत्तां !

**उषाः**—( आनंदानें ) ऐकलांत तुम्ही !

**विनायकः**—ऐकला कसला ! ऐकूं आला ! !

**उषाः**—हो ! हो ! ! चुकलें, यमूताई सांगत होती खरी, कीं आपण खोलींत पॉयशाचे फवारे उडवून माशा मारण्यांत गढून गेला होतात म्हणून !

**विनायकः**—सांगितलंन् कां तिनं आपणाला तें ! ( संतापानें ) लवकरच नवऱ्यासकट सासरीं परत जावं लागेल म्हणावं !

**उषाः**—या घरांतले मॅजिस्ट्रेटच आहांत आपण—तेव्हां वाटेल त्याची हकालपट्टी करण्याचा—अपमान करण्याचा हक्कच आहे तुम्हाला ! ( विनायक नुसता संतापल्यासारखें दाखवितो. त्याच्या जवळ जाऊन ) खरोखरच का तुम्हीं रागावले आहांत इतके माझ्यावर ! ( त्याच्या खांद्यावर हात ठेवायचा प्रयत्न करते )

**विनायकः**—( घाबरून मागें सरकून ) उषा ! !

**उषाः**—( एक पाऊल मागें घेऊन ) घाबरलांत ! !

**विनायकः**—घाबरलांत ! आपलं जेव्हां प्रेम होतं तेव्हां मी जर यत्किंचित् जवळ आलों तर तूं दूर—दहा योजनं दूर पळत होतीस ! आणखीन् आतां इतर पुरुष मंडळींशीं दोस्ती झाल्यावर...

**उषाः**—( संतापानें फुणफुणून ) दोस्ती ! दोस्ती ! !

**विनायकः**—हो ! हो ! दोस्ती—पांच सहा महिने त्याच्या संगतींत काढलेस—विलायतेहून जाऊन आलेला तो—सोडली असेल वाटतं त्यानं थोडी तरी लगट् करायला !

**उषाः**—( संतापून ) थोडी काय म्हणून ! !

**विनायकः**—( संतापून ) तीं वर्णनं आपलीं आपल्याजवळ ठेव !

**उषाः**—( लबाडीनें ) माणसानं कीं नाहीं सारीं कामं कशीं अगदीं वेळच्या वेळेवर करीत असावीं म्हणजे त्याच्यावर तुमच्यासारखी पश्चात्तापाची पाळी क्वचित्च येते !

**विनायकः**—पश्चात्ताप—कोण करतो आहे पश्चात्ताप !

**उषाः**—माझं लग्न दुसऱ्याच एका गृहस्थाशीं करण्याची वाटाघाट चालली आहे असं बाबांचं पत्र येताच मी ताबडतोब तुम्हाला सांगितलं, कीं ‘ पहारे बुवा ! प्रसंग असा आहे, तुमचं प्रेम खरं असेल तर लग्न ताबडतोब उरकून

टाका. '—पण तुमची तसं करण्याची हिम्मत झाली नाहीं !—अन् मग, मी पडलें बायको माणूस तेव्हां मला घरीं जावं लागलं...

**विनायकः**—( संतापून ) अन् एका अनोळखी माणसाबरोबर प्रेमाच्या गुल्गुल् गोष्टी बोलाव्या लागल्या—त्याच्या समोर लाजावं लागलं—नटावं लागलं—मुरडावं लागलं !

**उषाः**—अन् हें सारं आपल्या लाडक्या माणसाच्या बाबतींत चालू असतां तुम्ही इकडं परिक्षेचा अभ्यास करीत बसलांत !

**विनायकः**—नाहीं ! एक पोर भ्याड निघाली म्हणून अभ्यास सोडून देऊन रात्रंदिवस अश्रू ढाळीत बसायला पाहिजे होतं ! !

**उषाः**—इतके जर बेपर्वाई होतांत आपण त्या विषयासंबंधीं तर मग त्या गृहस्थानं माझ्याशीं सलगी केली असेल या कल्पनेनं संतापतां कां इतके !

**विनायकः**—कोण संतापतं आहे ?

**उषाः**—आरसा आणून दाखवतें पाहिजे तर !

[ त्याच्याजवळ जाते ]

**विनायकः**—( दोन पावलं मागें घेऊन ) पुरे ! प्रेम पुरे ! !

**उषाः**—पुरे म्हणून कां कुठं प्रेम आवरतां येतं कुणाला !

**विनायकः**—ज्या पोरीला खुद्द आपल्या बापाशीं Tussel घेतां येत नाहीं—अन् जी एखाद्या शेळीसारखी वाटेल त्याच्या मागून जायला तयार होते ती म्हणे प्रेम करणार ! तोंड बघा प्रेम करणाराचं ! प्रेम द्यायला अन् घ्यायला मनुष्य स्वतंत्र असावं लागतं !

**उषाः**—( मुद्दाम चिडवीत ) जो गृहस्थ आपल्या बापाला भिऊन प्रत्यक्ष आपल्या आवडत्या पोरीला वाटेल त्याच्याशीं लग्न करायला जाऊं देतो, त्यानं स्वातंत्र्याच्या गोष्टी बोलाव्या—आपल्याला तर हंसू येतें बुवा ! ( खुद्कन् हंसते )

**विनायकः**—समजली समजली तुझी अक्कल ! हजार वेळ सांगितलं असेल तुला कीं माझे बाबा माझ्या म्हणण्याच्या बाहेर नाहींत !—या घरांत मला पूर्ण स्वातंत्र्य आहे !—पण विद्यार्थीदशेंत लग्न करणें मला उचित वाटलें नाहीं !

**उषाः**—आपल्याला मात्र विद्यार्थीदशेंत बापाशीं भांडणं शक्य झालं नाहीं—अन् मला मात्र नानांशीं बेलाशक सामना घ्यायला सांगत होतांत ! आहे खरं हे पराक्रमी पुरुषाला शोभण्यासारखं वर्तन !

**विनायकः**—पूर्वीचे सर्व बेत आणि आखलेले कार्यक्रम बदलून तुझ्याशीं लग्न करायचं—अन् कारण काय, तर एका अनाळखी श्रीमंत माणसाला हे भावलं आवडलं, गोजिरवाणं दिसलं, अन् तो तें विकत घ्यायला तयार झाला, म्हणून !

**उषाः**—तसं नाहीं झालं तें ! एक पराक्रमी थापा मारणारा पुरुष वडलांना भिऊन योग्य वेळीं लग्नाच्या नादीं न लागतां परिक्षेचा अभ्यास करीत बसला—म्हणून !

**विनायकः**—( संतापाशियानें भडकून ) कितिदां सांगितलं असेल मी तुला उषा, कीं या घरांत मी पूर्ण स्वतंत्र आहे—होतों—म्हणून ! शिवाय माझे बाबा तुझ्या माझ्या लग्नाच्या विरुद्ध कधीच नव्हते !

**उषाः**—मग आतां अडलय् कुठं !

**विनायकः**—उषा आज दुपारीं—उद्यां सकाळीं—किंवा उद्यां दुपारच्या आंत—तूं किंवा मी हें घर सोडलंच पाहिजे ! (आपल्या खोलींत जाऊं लागतो)

**उषाः**—( त्याला परत हांक मारून ) आपण एकंदर तीन वेळा दिल्या आहेत—आज दुपारीं, उद्यां सकाळीं—किंवा उद्यां दुपारीं—यापैकीं खरी कोणती ?

**विनायकः**—Get out ! Get out ! I say ! !

**उषाः**—इतकं कांहीं अडलं नाहीं माझं—आपली इच्छा नसतांना आपल्याशीं बोलत बसायला ! ( रागारागानें निघून जाते )

**विनायकः**—शिवा !

[ शिवाचा अगदीं जवळून 'जी' असा आवाज येतो व मागोमाग तो प्रवेश करतो, तें पाहून विनायक थक्क होऊन ]

**विनायकः**—काय करीत होतास रे इथं !

**शिवाः**—काई नाई धनी, कांबरुना वालवून त्येंची घडी घालूनशान् ठ्येवत व्हतो !

**विनायकः**—शिवा, माझी बाहेरगांवीं जायची तयारी कर !

**शिवाः**—जी ऽऽ......किती दिवस न्हानार तुमी भाईर गांवीं ?

**विनायकः**—तुला काय करायचं आहे तें ?

**शिवाः**—तसं नवं, पन् कपड किती दिवस पुराया होव ते, मला कलाया नग ?

**विनायकः**—पंधरा वीस दिवसांची तयारी कर !

**शिवाः**—जी ( जातो व परत येतो ). धनी जमनार नाय त्यें !

**विनायकः**—जमणार नाहीं ? काय जमणार नाहीं ?

**शिवाः**—( हलकेच ) बाईसाब तुम्हास्नी जाऊ येनार न्हाईत.

**विनायकः**—ताईचा काय संबंध यांत ?

**शिवाः**—(थोडा हंसत ) ताईसाब न्हाई म्हंगालो मी. ( हलक्या आवाजांत ) बाईसाब म्हंगालो—बाईसाब !

**विनायकः**—बाईसाब ! बाईसाब कोणत्या !!

**शिवाः**—आपल्या नव्या !!

**विनायकः**—अक्कल नको शिकवूंस मला ! जा सांगितलं तें काम कर !

[ शिवा माना हलवीत जातो. ताई रागारागानें प्रवेश करते ]

**ताईः**—दादा, तुझा ताळतंत्र सुटला बरं का अगदीं !

[ प्रभाकर व उर्मिला प्रवेश करतात ]

**विनायकः**—सुटूं दे ! तूं नको अक्कल शिकवूंस मला !

**ताईः**—(संतापानें) इतका अगदीं वाहवत जाशील असं नव्हतं वाटलं मला ! उर्मिळाताई—तूं आणखी उषाताई—जायची तयारी करा आपली ! आमच्यासारख्या रानटी माणसांच्या घरांत राहण्यापेक्षां—

**उर्मिळाः**—छे ग बाई ! आपण नाहीं रे बुवा हें घर सोडणार, उषाचं अन् विनायकरावांचं लग्न नक्की ठरल्याशिवाय !

**विनायकः**—(ताईस) ठीक आहे, तुमचे हे वायफळ मनोरथ बोलून झाले म्हणजे मग......

**ताई:**—दादा !

**विनायक:**—अन् काय ग ! मोठेपणाचा आव आणून तूं मला अक्कल शिकवायला निघाली आहेस नाहीं ! पण गुलामांच्यापासून मला कांहींएक अक्कल शिकावयाची नाहीं समजलीस ?

**ताई:**—गुलामांच्यापासून !!

**विनायक:**—हो हो ! गुलामांच्यापासून !! ( प्रभाकरकडे बोट दाखवून ) तूं काल याच्या उष्टया ताटांत जेवायला बसली नव्हतीस ? एखाद्या कुलंगी कुत्र्यासारखी !

**ताई:**—( संतापून ) तूं रे कोण मला विचारणार ? माझ्या खुशीची गोष्ट आहे ती !

**प्रभाकर:**—हं विनायक, त्या बाबतींत असा वर्दळीवर येऊं नकोस अं ! आमचे भिन्न भाव लोपले आहेत—प्रेमानं आम्हीं एकजीव झालों आहोंत—तिथं कसलं आलं आहे उष्टं न सुष्टं !

**विनायक:**—भिन्न भाव लोपले तर नुसतं उष्टं खाण्याचाच कां आग्रह धरतेस ? प्रभाकर बाहेरून आला म्हणजे तळहातावर अन् गुढग्यावर रांगत जाऊन त्याचे बूट पुसत जा म्हणजे पॉलीशचा खर्च तरी वाचेल !

**ताई:**—मला वाटेल ते करीन जा ! तूं रे कोण मला शिकवणार ?

**प्रभाकर:**—विनायक तुला खोटं वाटत असेल, पण खरोखरच आमचे भिन्नभाव लोपले आहेत ! कसं—तें पहा ! सकाळीं काम करतांना नवं लुगडं मळेल म्हणून ती माझं धोतर नेसते आणखी मीही कधीं कधीं तिचं जुनेरं वेढून घेण्याचा निश्चय केला आहे !

**ताई:**—( रागानें ) इश्श !

**उर्मिळा:**—इश्श !! यमू तुला प्रभाकरपंतांच्या बोलण्यातलं मात्र इश्श दिसतं आणखिन् तें ऐकून तूं नाक सुद्धां मुरडतेस ! पण तुला त्यांच्या पानांत उरलेल्या उष्ट्या अन्नातलं मात्र इश्श दिसत नाहीं अं !

**प्रभाकर:**—विनायक ! उर्मिळाताई ! त्या पतिव्रतेला बिघडवूं नका अशी !

( ताईकडे वळून ) आर्य स्त्रिये ! तूं सतत माझ्या ताटांत जेवून आपल्या उज्ज्वल पातिव्रत्याचा नंदादीप असाच तेवता ठेव !

**उर्मिळाः**—यमू मी सांगू का तुला उष्ट्या ताटांत जेवण्याचे फायदे—दोन उष्टीं काढायला नकोत ! दोन ताटं घासायला नकोत ! अग आमच्या कॉलेजां-तल्या एका विद्यार्थ्यानं तर डिबेटींग सोसायटींत असं सांगितलन् एक दिवस कीं, नवऱ्याचं उष्ट खाणारी स्त्री—ही नेहमी स्वतःच्या नवऱ्यालाच वश राहते, आणखीन् परपुरुषाकडे डोळा वर करून सुद्धां बघत नाहीं !

**ताईः**—( संतापून ) मी इथून चालती होते कशी !

[ रागारागानें निघून जाते ]

**विनायकः**—( एकदम प्रभाकराकडे वळून ) आणखी तूं सुद्धां ऐट मिरवूं नकोस सुधारकी बाण्याची ! एकीकडे उघड्या डोळ्यांनीं हें घरांत चालू देतोस अन् एकीकडे सुधारणेची ऐट मिरवतोस ! तुझं सगळं शिक्षण मातीमोल झालं आहे !

**प्रभाकरः**—पोलीसमधे नोकरी धरली तेव्हांच शिक्षण मातीमोल ठरलं ! तें आज नव्यानं काय ठरायचं राह्यलं आहे ! ( उर्मिळा व विनायक यांचेकडे पाहून ) पण आतां तुमचीं दोघांचीं भाषणं ऐकून मात्र थक्क झालों मी !

**उर्मिळाः**—तें काय म्हणून ?

**प्रभाकरः**— आज सकाळपासून तुम्ही आणखी विनायक यांचं एक मत झालेलं आत्तां प्रथमच दृष्टीस पडतंय्—म्हणून !

**शिवाः**—( घाईघाईनें प्रवेश करून प्रभाकरास ) ताईसाब लय् गरम झाल्याती अन् घरी जायची बांदाबांदी सुरूं केलिया !

**प्रभाकरः**—बांधाबांधी सुरूं केली ! वेडीच आहे ती !

[ घाईघाईनें आंत जातो ]

**विनायकः**—शिवा, तिनं कितीही बांधाबांधी केली तरी गाडी आणणं तुझ्या हातचं आहे ना ! गाडी आणूं नकोस म्हणजे झालं !

**शिवाः**—अन् तुमचा पन् ब्येत रद् करुन टाकलाया भाईर गांवीं जायचा !

**विनायकः**—माझा बेत रद्द केला ? कुणी ? कसा ?

**शिवाः**—बाईसायबांनीं अन्—मी ! मी तुमची बांदाबांदी कराया ग्येलो तर त्या म्हंगाल्या न्हाऊ द्ये—मीच जानार हाय निगूनशान् ! मी म्हंगालो कट्कट् ग्येली बांदाबांदीची ! आमच न्हान् धनी लय उतावल !

[कमरेवर हात देऊन विनायक त्याच्याकडे संतापाची मुद्रा धारण करून पहात उभा राहतो. त्याची मुद्रा पाहून शिवा किंचित् घाबरत तेथून काढता पाय घेतो ]

**उर्मिळाः**—पुन्हा पळायची तयारी चालली होती वाटतं ?

**विनायकः**—पुन्हां पळायची !

**उर्मिळाः**—आपण दोघंही परिक्षा पास झाल्यानंतर, तुम्ही पळाला नव्हतां माझ्यापासून !

**विनायकः**—( शांत आवाजांत ) उर्मिळाबाई, त्यांतली नवलाची गोष्ट अशी आहे कीं आपण त्या विषयासंबंधी बेधडक बोलूं शकता !

**उर्मिळाः**—कां बरं ! जे घडलं त्यासंबंधीं बोलायला काय हरकत आहे ?

**विनायकः**—( भयाण आवाजांत ) खरं आहे तुमचं म्हणणं ! जेत्यानं जितासमोर वाटल ते बोलायला काय हरकत आहे ! कोळ्यानं जाळ्यांत सांपडलेल्या माशीची थट्टा केली, तर त्याला कोण अडवणार आहे !

**उर्मिळाः**—तुमची ही आलंकारिक भाषा मला समजत नाहीं ! तुम्ही त्या वेळीं एकाएकीं कां निघून गेलांत, कॉलेज कां बदललंत, जिथं जिथं मी असण्याचा संभव होता ती ती जागा कां टाळलीत—गेल्या तीन वर्षांत माझी एकदाही भेट कां घेतली नाहींत हें सारं जर तुम्ही सोप्या भाषेंत सांगणार असाल तर मी तें ऐकून घ्यायला तयार आहे !

**विनायकः**—( औपरोधिक स्वरांत ) हे सारं आलं होतं तर आपल्या लक्ष्यांत !

**उर्मिळाः**—माझ्या एकटीच्याच काय, सर्वांच्याच लक्ष्यांत आलं होतं तें !

**विनायकः**—अन् त्याचा जाब तुम्ही मला आज जवळ जवळ तीन वर्षांनीं विचारतां आहांत !

**उर्मिळाः**—मला संधीच कुठं दिलीत तुम्ही !

**विनायकः**—तुम्हाला मी संधी देणार ! ती कशी काय ?

**उर्मिळाः**—गेल्या तीन वर्षांत आपली दोघांची जर एकदांही भेट नाहीं तर मी तुम्हाला विचारायचं तरी केव्हां !

**विनायकः**—इतकी जर आतुरता होती तुम्हाला त्या प्रश्नासंबंधीं तर तुम्ही यायचं होतंत माझ्याकडे !

**उर्मिळाः**—मी यायचं ? मी ! !

**विनायकः**—कां नाहीं !

**उर्मिळाः**—कां नाहीं ! !

**विनायकः**—मी सांगतो तुम्हाला कां नाहीं तें ! तुम्ही स्त्री म्हणून ! तुम्हाला आपल्या सामर्थ्याची पूर्ण जाणीव आहे म्हणून ! तुम्ही जाळीं विणण्यांत पटाईत आहांत म्हणून ! तुमच्या गुप्त जाळ्याचे पाश एकदां आमच्या सर्वांगा-भोंवतीं लपेटले म्हणजे आम्ही जाणार कुठं पृथ्वी सोडून ! तुम्ही फेंकलेले पाश इतके नाजूक कीं जवळ जवळ अदृश्य; हवे तितके लांब. त्यांत एकदा माझ्या-सारखी माशी सांपडली कीं तडफडेल, फडफडेल—पण जाणार कुठं ! या भावनेनं तुम्ही स्वस्थ बसलांत !

**उर्मिळाः**—नुसती पुस्तकं वाचून वेड लागल्यासारखं झालं होतं तुम्हाला ! दुसरं काय ? त्यामुळं तुम्हाला वाटायला लागलं कीं तुम्ही पुरुष म्हणजे भक्ष्य आणि आम्ही—भक्षक ! एवढसं सहज विनोदानं बोललें मी कांहीं तरी—तर तें मनाला लावून घेऊन निघून गेलांत अन् लोकांच्या मनाला मात्र निष्कारण दुःख दिलंत !

**विनायकः**—दुःख दिलं !

**उर्मिळाः**—शंका वाटते तुम्हाला ?

**विनायकः**—खरं असेल कदाचित् !

**उर्मिळाः**—खरं असेल कदाचित् ! !

**विनायकः**—एकंदर लक्षणं तर दिसत नव्हतीं दुःख झाल्याचीं.

**उर्मिळाः**—नव्हतीं ! तीं कशी काय ?

**विनायकः**—मी कॉलेज बदलल्यावरसुद्धां नेहमीप्रमाणं तुम्ही परिक्षा फर्स्ट क्लासांत पास झालांत—अन् उलट कित्येक वेळां तुमच्यापेक्षां जास्त मार्क मिळवणारा मी तिसऱ्या वर्गाशिवाय...

**उर्मिळाः**—अजूनसुद्धां तुम्ही अगदीं पहिल्याइतकेच—

**विनायकः**—(ओरडून) अजाण आहांत ! निर्बुद्ध आहांत ! खोडकर आहांत ! बोला, त्या वेळीं जे बोलला होतात तें पुन्हा बोला !

**उर्मिळाः**—( अगदीं मृदु आवाजांत ) मी तुम्हाला खरं सांगू का—तुम्ही रागानं निघून गेलांत तेव्हांपासून मी इतकी दु:खी झाले कीं कित्येक दिवस फारशी कोणामध्यें मिसळलेच नाहीं—त्यामुळं सहाजिकच माझा सारा वेळ माझ्या खोलींत जायला लागून आपोआपच अभ्यास जास्त झाला !

**विनायकः**—पण माझी किती अवनति झाली याची कल्पना आहे का तुम्हाला ! वेळ जाईनासा झाला म्हणून तुम्ही जास्त अभ्यास करायला लागलांत अन् मी सिगारेटा ओढायला लागलो ! पुस्तकांचीं कपाटं सोडून गडीमाणसा-बरोबर खुषमौजेच्या गोष्टी सांगण्यांत वेळ घालवायला लागलो ! दारूबाज बनलो नाही ही दैवाची खैरच म्हणायची !

**उर्मिळाः**—( त्याच्याकडे निरखून पाहून ) बहुधा उषानं वाचवलं असावं तुम्हाला !

**विनायकः**—होय दारूच्या जागीं उषा आली !

**उर्मिळाः**—दारूच्या जागीं !

**विनायकः**—मनाला कांहीं तरी अडवणूक हवी, म्हणून मी उषाशीं मैत्री खुशाल वाढूं दिली—पण तुम्हाला काय वाटतं, तुमच्या जाण्यानं माझ्या मनांत निर्माण झालेली ओसाड उषा सहजासहजीं भरून काढूं शकली असती म्हणून !

**उर्मिळाः**—( मन आवरून ) पण तें आतां विसरून जा सारं ! आयुष्यांत करूं नये इतकी भयंकर चूक तुम्ही करून बसलां आहांत—

**विनायकः**—( आश्चर्यानें थक्क होऊन ) भयंकर चूक !

**उर्मिळाः**—होय, भयंकर चूक ! तुम्ही गरीब बिचाऱ्या उषाला तिच्या प्रेमांत उत्तेजन दिलंत !—तें इच्छा नसतांना दिलंत, हें मला आतां पहिल्यान्दां कळतं आहे ! पण त्या वेळीं याची कल्पनाही नसल्यामुळं, मनांत असूनही तुमची समजूत पाडण्याकरतां मी तुमच्याकडे येऊं शकलें नाहीं—पण जाऊं द्या तें ! जें झालं ते झालं ! तें कधींच भरून येणं शक्य नाहीं ! ( दुःख आवरून ) पण त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट इतकीच आहे कीं उषाचं तुमच्यावर निरतिशय प्रेम आहे—आणि तुम्हाला अत्यानंदाची गोष्ट सांगायची म्हणजे उषा बापाच्या म्हणण्याला एक क्षणभरही बळी पडलेली नसून तिनं आपण होऊन बापाशीं भांडून त्या गृहस्थाशीं लग्न मोडून टाकलं आहे—अन् ही गोष्ट केवळ स्वाभिमानानं तिनं तुम्हाला सांगितली नाहीं—कारण तुम्ही तिच्या एकाही पत्राला जबाब दिला नाहीं !

**विनायकः**—उषानं बापाशीं सामना घेतला ? तें लग्न उषानं मोडलं ?

**उर्मिळाः**—हो !

**विनायकः**—पण तें कांहीहीं असो, कोणत्याही कारणानं कां होईना उषाचं आणखी माझं लग्न आज मोडलेलं आहे ! तें फिरून जुळवणं न जुळवणं ही माझ्या खुषीची गोष्ट आहे !

**उर्मिळाः**—ती गोष्ट आतां तुमच्या एकट्याच्या खुषीवर राहिलेली नाहीं !

**विनायकः**—कारण ?

**उर्मिळाः**—उषा अगदीं तुमच्या सांगण्याप्रमाणं वागली आणखी तिनं बापाशीं भांडून तें लग्न मोडलं तेव्हां तुम्हाला आतां मुळीच वचनभंग करतां येणार नाहीं.

**विनायकः**—त्यासंबंधीं मी आज तुम्हाला निश्चित असं कांहींच सांगूं शकणार नाहीं, आणखीन् मी तुम्हाला स्पष्ट बजावून ठेवतो कीं माझी सम्मती घेतल्याशिवाय तुम्ही उषाला यापुढं कांहींही अभिवचन देऊं नका ! आयुष्यांतली अत्यंत आनंदमय गोष्ट आज मला प्रथमच कळते आहे; अशा वेळीं मी कोणतीही गोष्ट नक्की ठरवण्याच्या मनःस्थितींतच नाहीं.

**उर्मिळाः**—( निश्चयाच्या स्वरांत ) तें तुम्हाला ताबडतोब ठरवायलाच पाहिजे !

( निघून जाते )

[विनायक कांहींसा आनंदांत, कांहींसा विचारांत गर्क होऊन उभा राहतो]

**विनायकः**—उर्मिलेनें माझ्यावर प्रेम केलं ! ( आनंदातिशयानें बेहोष होऊन ) आतां जगांत आनंदाशिवाय दुसरं काय शिल्लक राहिलं आहे !

[ एकदम झोपाळ्यावर बसून जोरा जोरानें झोके घेतो. कृष्णा, शंकर प्रवेश करतात ]

**कृष्णाः**—विनायक वाटाणे येतो आहे इतक्यांत !

[ विनायक उत्तर देत नाहीं ]

**शंकरः**—विनायक तो तुला थोडा वचकून आहे बरं का ! त्याला जर का तूं उत्तेजन दिलंस बोलायचं—तर स्वारी खुलेल नुसती.

**कृष्णाः**—अन् हें रे काय विनायक ! काय झालय् काय तुला—असा मुग्ध कां तूं ?

**विनायकः**—( सावध होऊन खोटं हंसत ) अरे बाबांनीं मला गुडगुडी ओढतांना पाह्यलं होतं सकाळीं, म्हणून ते खूप रागावले माझ्यावर आत्तां इतक्यांत...

**शंकरः**—ए, थाप मारूं नकोस अं आमच्याजवळ—आम्ही कांहीं बाबासाहेबांना आज सकाळपासूनच नाहीं ओळखायला लागलों नव्यानं !

**कृष्णाः**—स्वारीचं उषाताईशीं झालेलं दिसतय् कांहीं तरी भांडण ! अन् आम्हाला देतो आहे थाप !

( प्रभाकर येतो )

**विनायकः**—( कृत्रिम हंसत ) बावळट आहांत तुम्ही—हं तो वाटाणे येणार आहे ना आज ! खूप गम्मत करूं आपण त्याची ! प्रभाकर तूं थांब इथं, हा मी आलोंच ! ती गुडगुडी नाहींशी करतो एकदा डोळ्यासमोरून !

( विनायक खोलींत जातो )

**प्रभाकरः**—कृष्णा सकाळीं ठरल्याप्रमाणं मी वाटाणेला दिसत नाहीं अं !

**कृष्णाः**—ठीक आहे !

**प्रभाकरः**—पण विनायकाला मात्र तुम्ही जरूर गोवा या प्रकरणांत !

**शंकरः**—त्याची तुम्हाला नको काळजी ( पाहून ) जा जा तुम्ही आंत ! हा पहा आलाच वाटाणे !

( प्रभाकर घाइघाईनें निघून जातो. वाटाणे प्रवेश करतो )

[ त्याचा पोषाख विशेष मौल्यवान नसून भपकेबाज मात्र आहे. सूटचें कापड मुद्दाम भपकेबाज निवडलें असून, शर्ट, खिशा-बाहेर डोकावणारा हातरुमाल वगैरे वगैरे बाबतींत विलक्षण रंगवैचित्र्य दिसून येतें. पायांत पेटंट लेदरचे शूज असून त्याच्या पोषाखांत अभिरुचीपेक्षां दिखाऊपणाचें प्रदर्शनच अधिक. स्वतःचा कॉलर, नेकटाय, नीटनेटका आहे किंवा नाहीं याकडे तो मधून मधून लक्ष देत असून, हालचालींत रुबाबदार सफाई आणण्याचा त्याचा प्रयत्न चालू असतो ]

**कृष्णाः**—यावें ! यावें ! ! ( मोठ्यानें ) विनायक ! ए विनायक ! !

**विनायकः**—( आंतून ) आलों ! आलों ! ! ( बाहेर येऊन ) या ! वाटाणे ! आम्ही फार दिवसापासून आपलं नांव ऐकत होतो. पण भेटीचा योग आज आला !

**वाटाणेः**—( त्याच्याशीं ऐटीनें हस्तांदोलन करून ) माझ्याही मनांत फार दिवस आपली ओळख करून घ्यायची होती ! आमच्या कॉलेजमधले एक हुषार विद्यार्थी म्हणून तुमच्या संबंधीं मला एक प्रकारचा अभिमान वाटे—पण तुम्ही कॉलेज बदललंत, आणखी अपशकून झाला तुम्हाला ! पहिल्या वर्गाच्या ऐवजीं तिसऱ्या वर्गांत आलांत तुम्ही !

**कृष्णाः**—वाटाणे ! अहो कॉलेज बदलण्यानं असं झालं, असं का वाटतं तुम्हाला ! अहो हें लव्ह अफेअर नडलं, लव्ह अफेअर !

**शंकरः**—अहो तुमच्या पोरीवर प्रेम करायला गेली स्वारी—अन् फसली,—तोंडघशीं पडली !

**वाटाणेः**—( ऐटींत उभा राहून ) हें असं पुष्कळांचं होतं ! पण विनायकराव उषाला पत्रं लिहायला लागले, तेव्हांच मी ओळखलं असं कांहीं तरी होणार म्हणून—अन् उषाला एकदां धोक्याची सूचना द्यावी या इराद्यानं त्यांचीं पत्रं सुद्धां पकडली मी !

**विनायकः**—पत्रं पकडली !

**वाटाणेः**—संशय वाटतो कीं काय तुम्हाला ?

**विनायकः**—वाटाणे ! हे तुम्हीं खात्रीनं माझ्या कल्याणाकरतांच केलं असलं पाहिजे हें तर उघडच आहे—पण एका दृष्टीनं हे तुमचं करणं नीतीला सोडून आहे असं नाहीं का तुम्हाला वाटत ?

**वाटाणेः**—नीतीला सोडून ! ही तुमची नीति नीति म्हणून काय चीज असते, ती आपल्याला नाहीं बुवा कळत—अहो मी जर तुमच्या नीतीच्या कल्पना पाळायला लागलों तर...

**कृष्णाः**—तर कॉलेजमधल्या मुलींची मृत्युसंख्या खास वाढेल !

**विनायकः**—मृत्युसंख्या वाढेल ! ती कशी काय ?

**कृष्णाः**—( वाटाणेकडे पाहून ) वाटाणे ! हा आपला मित्र अगदीं गांवढळ आहे—( विनायकाकडे वळून ) अहो महाराज ! वाटाणे जर तुमचं हें नीति-पुराण पाळायला लागले, तर खरोखरच हजारो मुलींना हृद्रोग लागून त्या बिछान्याला खिळतील ! कारण यांच्यावर शेंकडों मुली नित्य प्रेम करीत असून जर यांनीं त्यांच्याशीं थोडीबहुत देवाण घेवाण केली नाहीं तर—बिचाऱ्या आजारी पडतील, दुःखी होतील !

**विनायकः**—होय वाटाणे ? खरं आहे हें ?

**वाटाणेः**—खरं आहे ? संशय वाटतो तुम्हाला ?

**विनायकः**—पण याचं कारण ?

**शंकरः**—( एकदम् ) यांच्या अंगचे विविध गुण !

**कृष्णाः**—( विनायकास ) समजलं रे गांवढळा ? तूं आपला नुसता परीक्षा पास होत बस—पण पोरी भाळवायला लागणारे गुण कांहीं निराळेच असतात ! काय वाटाणे ?

**वाटाणेः**—तर ! अहो मागं एकदां मी क्रिकेटचा बॉल—बोलींग करतां करतां चारशें यार्ड दूर फेंकला ! अन् एक पोरगी इतकी खुश होऊन गेली माझ्यावर, कीं तिनं माझ्यावर एक प्रेमाचा गझ्झल सुद्धां लिहीला !

**विनायकः**—वाटाणे खुष आहो बुवा आपण तुमच्यावर ! ( वाटाणे आनंदानें हंसतो ) एकंदरींत तुमच्यावर सर्व वर्णांच्या अन् सर्व जातींच्या मुली भाळतात तर ! पण कायहो मी असं ऐकलं आहे कोणाच्या तरी तोंडून, कीं प्रीतीची भाषा ही परकी भाषा असून चालत नाहीं ! एका मातृभाषेशिवाय प्रेमाच्या गुलगुल गोष्टी कोणालाच बोलतां येत नाहींत—मग असं असून तुम्ही इतक्या वेगवेगळ्या जातींतल्या मुलींशीं इतकं सलगीचं प्रेम करूं तरी कसं शकतां !

**वाटाणेः**—You are a clown ! mere clown ! अगदीं शुद्ध गांवढळ आहांत तुम्ही !

**विनायकः**—( त्याची ही सलगी पाहून थक्क होऊन पण मन आवरून ) गांवढळ तो कसा काय बुवा ?

**शंकरः**—गांवढळ नाहीं तर काय !

**कृष्णाः**—नुसतीं पुस्तकं वाचीत बैस !

**शंकरः**—अरे जगाची कांहीं माहिती तरी आहे का तुला ?

[ विनायक भडिमारानें चकीत झाल्यासारखें दाखवून सर्वांच्या तोंडाकडे भिरीभिरी पहातो ]

**विनायकः**—काय केलं आहे तरी काय मी ?

**कृष्णाः**—काय केलं आहेस ! अरे या थोर विभूतीला जगांतल्या, जवळ जवळ सगळ्या भाषा येतात !

**विनायकः**—वाटाणे ! खरं हे !

**वाटाणेः**—खरं ! यझो, हांश् , शिकॅकू, किशू—जपानी; फॉं व्हिटेनबर्ग—जर्मन; ला फॉशिनॉर—फ्रेंच; लू सिंग टिंग चांग—चायनी !

**शंकरः**—बोल आतां, याच्यावर सर्व जातीच्या पोरी भाळल्याशिवाय रहातील का ?

**कृष्णाः**—पण कायरे वाटाणे तुला मिस् साठेचं अन् परांजपेचं लग्न मोडलं, तें कळलं का ?

**वाटाणेः**—कळलं का ! अरे वेड्या त्या प्रकरणांतलीं सर्व अंडी पिल्लीं मला माहीत आहेत समजलास !

**कृष्णाः**—म्हणजे या प्रकरणांत पिछापर्यंत मजल गेली होती कीं काय ?

**वाटाणेः**—अरे शंका आहे कीं काय तुम्हाला ? पण ती पोर म्हणजे खेळाडू आहे नुसती ! Great Sport ( हळू आवाजांत ) एका दृष्टीनं वाईट वाटतं सांगायला, पण त्यांचं लग्न मोडायला मी कारणीभूत झालों !

**विनायकः**—तुम्ही ! तें कसं काय बुवा ?

**वाटाणेः**—अहो परांजपे गाढवपणा काय करून बसला, कीं लग्न ठरल्याबरोबर त्या आनंदांत एक दिवस मला तिच्याबरोबर चहाला बोलावलन् !

**कृष्णाः**—बरं मग ?

**वाटाणेः**—मग काय गांवढळांनो ! एकदां तिनं मला पाहिल्यावर, अन् माझा सहवास घडल्यावर ती दुसऱ्याशीं लग्न करायला तयार होईल होय ? अरे मी जायला निघालो तों दुःखी झाली ! खचली !

**शंकरः**—बरं पुढं !

**वाटाणेः**—पुढं काय ! झुरणीस लागली ! मला रोज निरोपावर निरोप ! शेवटीं माझ्यावर एक सुंदर गझ्झल लिहून पाठवलान् ! अन् मग दया येऊन मी जायला यायला लागलों तिच्याकडे !

**विनायकः**—वाटाणे ! तो गझ्झल येतो का तुम्हाला ?

**वाटाणेः**—हो ! हो ! फारच उत्तम आहे तो ! She is a great poetess !

( गझ्झल म्हणतो )

**आलांत ते कशाला, प्रिय जाहलां कशाला,**
**केली न पूसपास, शिरलांत राजरोस,**
**केलात मूक हल्ला, बळकाविलात किल्ला.**
**ही नजर बाइ न्यारी, भिडली कशी जिव्हारीं,**
**नाहीं विचार केला, पुशिलें न मैत्रिणीला,**
**ही जाळपोळ करुनी, जातां कसे पळोनी,**

**ही काय मोगलाई, पचणार चोरि नाहीं,**
**टाका इथेंच माल, मग जा कुठें खुशाल,**
**हृदयांतल्या हिऱ्याला, जा ठेवुनी हवाला,**
**कां लागलांत जाया ? केला विनोद राया !**
**मीतूंपणा निमाला, रागावतां कशाला !**

**विनायकः**—मग तुम्ही काय केलंत ?

**वाटाणेः**—मी सुद्धां कवितेंत उत्तर दिलं !

[ कविता म्हणतो ]

**अंबुदां भंगुनी । गगनिं सौदामिनी ।**
**चमकली कामिनी । तेविं पुढतीं ॥**
**शुभ्र दंतावली । हांसतां देखिली ।**
**दृष्टि मम लोभली । सहज तेथें ॥**
**अंजिरी पैठणी । नेसली भामिनी ।**
**मधुर मधुयामिनी । सम विराजे ॥**
**हरित मृदुशाद्वलीं । बैसुनी तरुतलीं ।**
**नजर तूं टाकिली । अयि मृगाक्षी ! ॥**
**प्रथम तुज पाहिलें । अमित दिन जाहले ।**
**परि न कधिं वाहिले । शब्द तुजला ॥**
**शून्य वातायनीं । बैसुनी निशिदिनीं ।**
**हृदयसिंहासनीं । मूर्ति निरखीं ॥**
**रूप तव मोहिनी । बिंबलें लोचनीं ।**
**म्हणुन मधु गायनीं । पूजिं तुजला ! ॥**

**शंकरः**—ही कविता तुझी आहे ?

**वाटाणेः**—मग कोणाची समजलास तूं ?

**शंकरः**—मला ही काळेच्या सहकार-मंजिरींत छापलेली आठवते !

**वाटाणेः**—हा मूर्खा! तुला काय वाटतं, मी स्वतः कविता लिहीत बसलो होतों म्हणून! अरे मी काळेला कल्पना दिली अन् सांगितलं काढ लिहून! अन् त्यानं ती लिहीली! म्हटलं होतो आहे बिचारा प्रसिद्ध!—आपलं काय जातं त्यांत!

**शंकरः**—अस्सं!

**कृष्णाः**—बरं! तूं मुख्य ज्या कारणाकरतां आलास तें तर राहूनच गेलं.

**शंकरः**—वाटाणे! उषाचं तुझ्यावर प्रेम आहे, हें नक्की!

**विनायकः**—तें कशावरून?

**कृष्णाः**—हं विनायक! हेवा नको करूंस त्याचा!

**विनायकः**—हेवा नाहीं करीत! पण कशावरून म्हणतोस तूं हें?

**कृष्णाः**—अरे वाटाणे क्लासमध्यें नसला, तर ती डोळा वर करून सुद्धां पाह्यची नाहीं! पण एकदां का हा समोरच्या बाकावर येऊन बसला फॅशनेबल कपडे घालून—म्हणजे कांहीं विचारूं नकोस! डोळे काय उडवील, पदर काय सांवरील, डिफीकल्टीज् काय विचारील! काय वाटाणे खरं कीं नाहीं?

**वाटाणेः**—माहीत आहे मला तें!

**शंकरः**—अन् वाटाणे सुद्धां खुश आहे तिच्यावर! काय वाटाणे?

**वाटाणेः**—अरे खूष म्हणजे! तिच्याकरतां मी खर्च काय केला आहे असं समजतां तुम्ही? हा सूट पाहिलास—शंभर रुपये मोजून दिले आहेत त्याला! आमच्या बुढ्ढयाला कळलं तर जागच्या जागींच गतप्राण होऊन पडेल!—अन् हा सर्पवर्ण नेकटाय् कां खरेदी केला असेल असं वाटतं तुम्हाला?

**विनायकः**—
**शंकरः**—
**कृष्णाः**— } आपल्याला नाहीं बोवा ओळखतां येत!

**वाटाणेः**—Clowns! Mere Clowns!! शुद्ध गांवढळ आहांत तुम्ही! अरे आपल्या प्रियकरणीच्या सर्व टेस्ट्स Study कराव्या लागतात समजलांत!

**कृष्णाः**—म्हणजे! तुमच्या प्रियतमेला साप आवडतात कीं काय?

**वाटाणेः**—काय मूर्ख आहेस रे तूं! अरे उषा तें नवीन डिझाइनचं पातळ नेसते ना कधीं कधीं, त्याला अनुरूप असा हा नेकटाय मी मुद्दाम खरेदी केला— Colour Harmony आहे ही! तुमच्या मराटींत रंगसंगती म्हणतात याला रंगसंगती! अरेरे या प्रेमांतल्या नाजूक छटा तुम्हाला काय कळणार?

**शंकरः**—बरं पण कायरे तुम्हां दोघांचं बोलणं चालणं आहे कीं नाहीं थोडंबहुत!

**वाटाणेः**—छे!

**कृष्णाः**—आश्चर्य आहे बुवा!

**वाटाणेः**—अरे एक तर ती रेसीडेन्सींत रहाते—अन् दुसरं ती विनायकाशीं लग्न करणार अशी अफवा उठलेली—अन् विनायकराव पडले आपले दोस्त!

**शंकरः**—अस्सं होय! बरं, मग आतां तुला विनायकासमोर सांगतो, कीं विनायकरावांचं तिच्यावर आतां प्रेम नाहीं अन् तिचंही विनायकरावांवर नाहीं! पण मैत्री मात्र अजून कायम आहे!

**कृष्णाः**—आणि तिच्या बोलण्यावरून त्यांची खात्री झाली आहे कीं तिचं तुमच्यावर प्रेम आहे!

**वाटाणेः**—दोस्त खरं हे?

**कृष्णाः**—होय, खरं! अन् तुझी तशी इच्छा असली तर उद्यां तुझा अन् तिचा भेटीचा योगही आणणं शक्य आहे!

**वाटाणेः**—(आनंदित होऊन) भेटीचा योग! कुठं बोला! बोला लवकर!

**कृष्णाः**—उद्यां उषा अन् उर्मिळा कॉलेज आटोपल्यावर आमच्यावरोबर फिरायला येणार आहेत, अन् आम्ही येईपर्यंत त्या आमची पार्कमध्यें वाट पहाणार आहेत! आम्ही यायला थोडा उशीर लावूं आणखी तूं तितक्यांतच येऊन धडक म्हणजे झालं.

**शंकरः**—अन् दे बार उडवून!

**विनायकः**—पण वाटाणे, एक गोष्ट लक्ष्यांत ठेवा अं, कीं उषाला गाण्याची फार आवड आहे. तेव्हां स्वतःची तिला ओळख करून देण्याच्या अगोदर जरा एखाद्या इंग्रजी गाण्याचे सूर हवेंत फेंकत फेंकत तिच्यासमोर जा!

**वाटाणेः**—हो हो ! त्याची नको काळजी.

**विनायकः**—आणखीन् शिवाय तिला स्पोर्टींग ड्रेस फार आवडतो !

**वाटाणेः**—आलं माझ्या लक्ष्यांत ! स्पोर्टींग ड्रेस चढवतो ! काळजी नको तुम्हाला अगदीं ! All right Gentlemen ! I am obliged to you all ! Thanks, Thanks very much !

**विनायकः**—वाटाणे, चष्मा घालायला विसरूं नका बरं का !

**वाटाणेः**—ठीक आहे ! चष्मा घेतो !

[ सगळ्यांना वांकून अभिवादन करीत जातो ]

**कृष्णाः**—काय विनायक ! आहे कीं नाहीं मूर्ति साक्षात् परमेश्वरानं घडवलेली !

**विनायकः**—आहे बुवा ! आपल्याला कल्पना नव्हती, कीं हा इतका Conceited—इतका डांबरट असेल म्हणून !

**शंकरः**—मग काय बेत ?

**विनायकः**—अरे बेत काय ! उडाव सरबत्ती !

**कृष्णाः**—शाबास ! दोस्त शाबास !

**शंकरः**—मग कुठं भेटायचं आपण ?

**विनायकः**—कृष्णाच्या घरीं !

**कृष्णाः**—
**शंकरः**— } ठीक आहे मग उद्यां दुपारीं !

**विनायकः**—ठीक आहे ।

[ कृष्णा शंकर जातात. ते जातांच उर्मिळा प्रवेश करते ]

**उर्मिळाः**—माझं ऐकाल का थोडसं ?

**विनायकः**—हो ! हो !

**उर्मिळाः**—तुम्ही या वाटाणेच्या भानगडींत मुळींच पडूं नका !

**विनायकः**—वाटाणेच्या भानगडींत पडूं नका ? कारण ?

**उर्मिळाः**—( किंचित् तीव्रतेनें ) एखाद्या कुकुबाळासारखं काय करतां ! उषासंबंधीं मनाचा कांहींएक निश्चय न करतां जर तुम्ही तिच्या भानगडींत पडलांत...

**विनायकः**—उषाचा काय संबंध यांत !

**उर्मिळाः**—एवढी साधी गोष्ट तुम्हाला कळत नाहीं, असं का समजायचं मी ?

**विनायकः**—( जरा नरमून ) विचार करीन मी याच्यावर ! वास्तवीक मी वाटाणेवर भडकलो आहे, तो त्यानं माझीं पत्रं चोरली म्हणून !

**उर्मिळाः**—( चिडून ) मग इतके जर तुम्ही रागावलां असाल त्याच्यावर तर त्याला कुस्तीला बोलवा—अन् करा मारामारी—लोकांचीं नांवं कां गोवतां त्यांत ?

**विनायकः**—( किंचित् विनोदानें ) तुम्ही मुली स्वतःला नवमतवादी म्हणवतां नाहीं—पण जरा कुठं कांहीं फट्ट वाजलं अन्...

**उर्मिळाः**—नाहींना ऐकायचं तुम्हाला माझं—मग काय हवें तें करा !

[ रागारागानें निघून दरवाजापर्यंत जाते ]

**विनायकः**—जरा ऐकून तर घ्याल !

**उर्मिळाः**—( जातां जातां ) कांहीं ऐकून घ्यायचं नाहीं मला !

[ विनायक तिच्या जाण्याच्या रस्त्याकडे पहात उभा राहतो ]

पडदा पडतो.

---

# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

[ **स्थळः**—कॉलेज क्वार्टर्स जवळील पार्क. एका बाकावर उर्मिळा व उषा बोलत बसल्या आहेत, इतक्यांत वाटाणे समोरून प्रवेश करतो. त्याचा पोषाख चित्रविचित्र आहे. पायांत पायमोजे असून गार्टर्स आहेत. त्यावर हाफ पॅन्ट आहे. अंगांत गोल्फचा कोट असून डोक्याला टोपीही गोल्फचीच आहे. डोळ्याला स्प्रिंगचा चष्मा असून तो गळ्यांत काळ्या रेशमी दोऱ्यानें अडकविला आहे. एका हातांत हॉकीस्टिक असून तो मुद्दाम छाती काढून तोंडानें शीळ घालीत उषा व उर्मिळा यांजकडे नजर फेंकीत पलीकडे जातो ]

**उर्मिळाः**—कोण ग हा ?

**उषाः**—ओळखला नाहींस वाटतं ! अग हा आमच्या क्लासमधला वाटाणे! असा संताप येतो मला त्याला पाहिल्याबरोबर !

**उर्मिळाः**—तो ग कां ?

**उषाः**—अग नेहमी पुढल्या बांकावर बसतो ! सारखा माझ्याकडे पहातो, फिदीफिदी हंसतो, मी जर कांही पोषाखांत फरक केला तर लगेच आपणही जाऊन ड्रेस बदलून येतो, अन् मी जर रागानं एखादे वेळेला त्याच्याकडे पाहिलं तर आपल्या मित्रमंडळीकडे विजयी मुद्रेनं नजर फेंकतो !—त्याला वाटतं माझं त्याच्यावर प्रेम आहे म्हणून !

**उर्मिळाः**—मग एखाद दिवशीं त्याला हांक मारून त्याची चांगली खरडपट्टी काढ !

**उषाः**—वा वा ! त्यानं तर स्वारी चांगलीच फुशारेल ! एखादे एखादे वेळेला तर मला असं वाटतं कीं, जर का मी पुरुष असते...

**उर्मिळाः**—पुरुष असतीस तर त्यानं तुझ्याकडे ढुंकून सुद्धां पाह्यलं नसतं ! अग मिशाविरहीत असे हे तुझे पोवळ्यासारखे सुंदर ओठ पाहून...

**उषाः**—For Shame ! उर्मिळा तुला कांहीं आहे कीं नाहीं !

**उर्मिळाः**—अग त्यांत काय झालं ! खरं तेंच बोलत होते मी !

**उषाः**—( एकदम नजर जाऊन ) अगबाई ! तो Reptile इकडेच येतो आहे !

**उर्मिळाः**—येऊं दे ! म्हणजे आयताच सांपडेल तडाख्यांत !

[ वाटाणे पुन: उलटून त्यांच्या जवळून शीळ घालीत त्यांच्याकडे नजर फेंकीत फेंकीत छाती काढून जाऊं लागतो ! ]

**उर्मिळाः**—अहो जरा इकडे या !

**वाटाणेः**—( स्मित हास्य करीत ) कोण मी ! मला हांक मारतां आहांत ?

**उर्मिळाः**—हो हो ! तुम्हाला ! तुम्हाला ! ! केवळ बायकांनीं हांक मारली म्हणून फुशारून जाऊं नका इतके !

**वाटाणेः**—छे छे ! छे ! ! छे ! ! !

**उर्मिळाः**—मघापासून इकडून तिकडे, अन् तिकडून इकडे सारखे शीळ घालीत फिरता आहांत, आणखी माझ्या ह्या मैत्रिणीकडे पहात पहात जाताहांत परत येताहात, तेव्हां म्हटलं आहे तरी काय तुमच्या मनांत !

**वाटाणेः**—प्रेम ! फक्त प्रेम ! !

**उर्मिळाः**—प्रेम ! कोणावर ?

**वाटाणेः**—( उषेकडे बोट दाखवून ) यांच्यावर !

**उर्मिळाः**—यांच्यावर ! कारण ?

**वाटाणेः**—कारण त्या सुशिक्षित आहेत म्हणून !

**उर्मिळाः**—मग अगदीं वेडे आहांत तुम्ही ! मी त्यांच्यापेक्षां जास्त शिकले आहे—तेव्हां जा अन् पुनः फेरविचार करून या ! अन् माझ्यावर प्रेम करायला लागा !

**वाटाणेः**—छे ! छे ! या सुशिक्षित असून शिवाय वर सुंदर आहेत !

**उषाः**—( भडकल्यासारखें दाखवून ) याचा अर्थ इतकाच कीं माझी मैत्रीण सुंदर नाहीं !

**वाटाणे:**—छे छे ! तसं नव्हे ! त्या सुद्धां सुंदर आहेत—पण त्यांचं सौंदर्य निराळं अन् आपलं निराळं !

**उषा:**—कसं निराळं ! कां निराळं ! !

**वाटाणे:**—( काय बोलावें हें कळेनासें होऊन ) म्हणजे त्यांतलं असं आहे—अ–अ–अ कीं ( आवंढा गिळून ) कांहीं कांहीं गोष्टींसंबंधीं जितकं थोडं बोलावं तितकं चांगलं !

**उर्मिळा:**—( कांगावखोरपणानें ) ऐकलंस उषा तुझे हे लव्हर्स माझा कसा अपमान करतात ते ! माझ्या सौंदर्यासंबंधानं जितकं थोडं बोलावं तितकं चांगलं अं !

**वाटाणे:**—तसं नव्हे ! तसं नव्हे ! तें इतकं पुष्कळ आहे...

**उर्मिळा:**—कीं तें उतू जातं आहे !

**वाटाणे:**—छे छे ! आपण फारच सुशिक्षित आहांत तेव्हां आपणाशीं एकंदर बोलणं फारच जड जातं, अन् पुढंही जाईल, म्हणून मी उषाताईंना propose करायचं ठरवलं—बाकी तसा माझा कांहीं वाईट हेतू नव्हता !

**उषा:**—माझी मैत्रीण सुशिक्षित अन् मी अशिक्षित ! अन् तुम्हाला काय वाटतं मी शिकणं बिकणं सोडलय् वाटतं सारं !

**वाटाणे:**—तसं नव्हे ! पण शिक्षण घेऊनही तुमच्यांत मार्दव कायम आहे—नाजूकपणा कायम आहे ! शिवाय आपण अजून स्वैंपाकही विसरलां नसाल !

**उषा:**—अन् माझी मैत्रीण—

**वाटाणे:**—अशी तुलना करूं नका—मी त्यांच्यासंबंधीं बोलतच नाहीं मुळीं !

**उर्मिळा:**—माझ्यासंबंधीं बोलतच नाहीं ! कारण उषा मी स्वैंपाक विसरले असं वाटतंय् त्यांना ! अन् त्यांना लागलेली दिसते आहे भूक ! तेव्हां ज्या पहिल्या कॉलेजांतल्या मुलीला स्वैंपाक येतो असं त्यांना वाटलं तिच्याकडे धावलेन् काय !

**उषा**—होय हो ! स्वैंपाकीण म्हणून का तुम्ही माझ्याशीं लग्न लावणार ?

**वाटाणे:**—( पूर्ण घाबरून ) अहो तसं नव्हे ! असा विपर्यास करूं नका माझ्या बोलण्याचा ! माझं म्हणणं इतकंच की, स्त्री सुशिक्षित झाली म्हणून काय

झालं, तिच्यापासून तर्कशास्त्र ऐकण्यापेक्षां, तिच्या हातची सुंदर आंब्याची डाळ खायला मिळेल, अन् पन्हं चाखायला मिळेल...

**उर्मिळाः**—उषा अग यांच्या अंगांत सुगृहीणीचा संचार झालेला दिसतो आहे ग बाई! आतां कांहीं धडगत नाहीं आपली!

( विनायक, कृष्णा, शंकर येऊन बाजूला उभे राहून गंमत पाहतात )

**उषाः**—अन् काय हो! तुम्ही ड्रेस काय केला आहेत असला विचित्र—वेड-बिड लागलं आहे कीं काय तुम्हाला!

**वाटाणेः**—अहो हा स्पोर्टींग ड्रेस आहे—आऊट डोअर गेम्स फारच आवडतात मला!

**उर्मिळाः**—हा चष्मा केव्हांपासून लावायला लागलेत तुम्ही!

**वाटाणेः**—मी-मी-मी—लावतो कधींकधीं चष्मा!

**उषाः**—लावतो कधींकधीं ( त्याच्याकडे वळून संतापानें ) कधींकधीं म्हणजे केव्हां हो! बायकांशीं प्रेम—लघाळपणा करायला जाता तेव्हांच ना! आणखी हा एखाद्या विदूषकासारखा पोषाख करून, तोंडानं शीळ घालीत छाती काढून कोंबड्यासारखे चारचौघांत वावरतां ते सुद्धां माझ्याकडे पहात पहात! लाज नाहीं वाटत तुम्हाला!

**वाटाणेः**—प्रेम आंधळं आहे! प्रेम निर्व्याज आहे—प्रेम अनंत आहे! अफाट आहे!

**उर्मिळाः**—समुद्रासारखं आहे, पृथ्वीएवढं आहे, हिमालयापेक्षां श्रेष्ठ आहे, आकाशापेक्षां गर्विष्ठ आहे, मोहरीहून सूक्ष्म आहे, अणूरेणूहून अदृश्य आहे... अहो महाराज आतां आपण घरीं जा आणि माझ्या या मैत्रिणीला प्रेमपत्रिका लिहा रोज दोनदोन तीनतीन!

**उषाः**—हें ग काय हें उर्मिळा! हा कसला हा फाजिलपणा! ( वाटाणेकडे वळून ) हें पहा पुन्हा मी तुम्हाला बजावून ठेवते कीं जर तुम्ही हा असला लघाळपणा कराल तर मला कडक उपाय योजावे लागतील!

**वाटाणेः**—तसं नाहीं—मी-माझं...

**उषाः**—खबरदार जास्त बोलाल तर—चलग उर्मिळाताई!

**उर्मिळाः**—थांब जरा ! ( वाटाणेकडे वळून ) तुम्ही इथे कॉलेज पार्कमध्यें मुलींना गांठून त्यांच्याशीं असा लघाळपणा करतां ! थांबा प्रिन्सिपॉलना जाऊन सांगते !

**वाटाणेः**—( काकुळतीच्या स्वरांत ) नको ! मी फिरून असं कधीं करणार नाहीं !

**उर्मिळाः**—ठीक आहे. एका अटीवर सोडते मी तुम्हाला—आत्तांच्या अत्तां घरीं जा अन् उषाची लेखी क्षमा मागा ! जा ! ! जा अगोदर !

**वाटाणेः**—जातो ! जातो—पण माझा हेतु वाईट नव्हता !

**उर्मिळाः**—तुमच्या हेतूंशीं आम्हाला कांहीं कर्तव्य नाहीं ! जातां कि नाहीं अगोदर !

**वाटाणेः**—हा गेलों ( वाटाणे जातों )

**उषाः**—इतकी ग कां रागावलीस त्या बिचाऱ्यावर ?

**उर्मिळाः**—सांगीन मग कधीं तरी ! चल आपल्याला उशीर झाला !

( दोघीही निघून जातात. विनायक, कृष्णा, शंकर पुढें येतात )

**कृष्णाः**—शंकर, धांव, धांव, धांव ! बोलाव त्याला परत !

( शंकर धांवत जाऊन वाटाणेला परत आणतो )

**कृष्णाः**—काय वाटाणे तुमच्या तर रोमान्सला प्रारंभ झालेला दिसतो !

**वाटाणेः**—अरे कसला प्रारंभ ! ती उर्मिळा म्हणजे मुलुखमैदान तोफ आहे नुसती ! छे बुवा निराश झालों मी अगदीं ! I am hopelessly disappointed! मित्रांनो Excuse me मी घरीं जातो आतां !

**शंकरः**—काय झालं तें तर सांगशील कीं नाहीं ? ( वेडावून ) म्हणे निराश झालों मी—I am hopelessly disappointed ! शुद्ध रडतराऊत आहेस झालं ! सांगितलं होतं कोणी तुला आमचा सल्ला घेतल्याशिवाय वागायला ?

**वाटाणेः**—तुम्ही डांबीस आहांत—सारे डांबीस आहांत !

**कृष्णाः**—डांबीस ? ते कसे काय बुवा ?

**वाटाणेः**—मी चांगला उत्तम ड्रेसमध्यें जाणार होतो, तर तुम्ही मला हा ड्रेस करायला लावलांत ! चष्मा घालायला लावलांत ! त्यामुळं मला त्या दोघींची बोलणीं खावीं लागलीं ! त्या उर्मिळेनं तर अगदीं शिल्लक ठेवलं नाहीं कांहीं बोलायचं !

**विनायकः**—वाटाणे, उर्मिळा तुमच्यावर संतापली, तुम्हाला टाकून बोलली त्यांत उषाचा काय बरं दोष ? अहो उर्मिळेला उषाचा हेवा वाटतो, दुसरं काय ?

**वाटाणेः**—( विचार करीत ) हेवा ! तुम्हाला असं वाटतं !

**विनायकः**—अहो तुमच्यासारखा मदनाचा पुतळा उषावर प्रेम करतो, पण तिच्यावर करत नाहीं, याचा तिला हेवा वाटतो दुसरं काय !—आणखी म्हणूनच ती उषाचं लग्न फिसकटवते !—एवढी साधी गोष्ट नाहीं आली तुमच्या लक्ष्यांत !

**वाटाणेः**—( विचार करीत ) हो तुमचं म्हणणं खरं आहे ! तिला हेवाच वाटत असला पाहिजे ! कारण ती एकदां म्हणाली सुद्धां कीं मी उषापेक्षां जास्त शिकले आहे, म्हणून माझ्यावर प्रेम करा !

**शंकरः**—मग एवढं कळत असून घाबरतोस काय असा !

**वाटाणेः**—तसा घाबरत नाहीं रे मी !

**विनायकः**—वाटाणे, उषा नाहींना तुम्हाला टाकून बोलली !

**वाटाणेः**—( चांचपडत ) उषा काय बोलते म्हणा ! तिचं भयंकर प्रेम आहे माझ्यावर ! ( आठवून ) पण तसंच पाहिला गेलं, तर थोडंसं टाकूनच बोलली म्हणायची—उर्मिळेच्या नादानं !

**विनायकः**—उषा तुम्हाला काय बोलली तें आठवतं का तुम्हाला ?

**वाटाणेः**—Oh ! त्या हृदयंगमेचा प्रत्येक शब्द माझ्या हृत्पटलावर कोरलेला आहे ! तिचे शब्द कितीही कडू असले तरी मला प्रियच !

**कृष्णाः**—अगदीं कामशास्त्राच्या नियमानं वागतां आहांत वाटाणे आपण !

**शंकरः**—गाढवसुद्धां आपल्या प्रियकरणीच्या लाथा अशाच प्रेमानं झेलीत असतो !

**विनायकः**—( शंकरला दाबीत ) कृष्णा, शंकर कांहीं काळवेळ समजतो का तुम्हाला ! त्या बिचाऱ्याची विरही प्रेमानं कोण त्रेधा उडते आहे अन् तुम्हा दोघांना थट्टा सुचते आहे ! अशा वेळीं आपण सर्वांनीं त्याला मदत केली पाहिजे !

**वाटाणेः**—विनायक ! तूं माझा एकटा मित्र आहेस ! You are my only friend !

**कृष्णाः**—विनायक आम्ही दोघेही वाटाणेची अनुकंपनीय स्थिती पाहून दुःखानं होरपळून गेलों आहोत ! मला वाटतं विरही प्रेमानं पोळलेल्या त्याच्या शरिरावर अगोदर आपण कांहीं तरी थंड उपचार करावे !

**शंकरः**—चंदन, कमळपत्रं हीं मदनाच्या तापाला जिंकणारीं मुख्य आयुधं कुठं बरं मिळतील !

**विनायकः**—( त्यांना डोळ्यानें दाबून ) हूं ! वाटाणे यांच्या फाजीलपणाकडे लक्ष्य देऊं नका ! मला वाटतं या प्रकरणांत तुमचा कांहीं तरी भयंकर गैरसमज झालेला दिसतो ! उषेचं बोलणं मला खडान् खडा सांगा पाहूं !

**वाटाणेः**—( आठवत ) पहिल्यानं ड्रेसवरून रागावली ! मग शीळ घालण्यावरून बोलली ! नंतर छाती काढून चालण्याबद्दल संतापली !

**विनायकः**—अरे ! अरे ! अरे ! वाटाणे मला तुमची कींव येते !

**वाटाणेः**—म्हणजे !

**विनायकः**—अहो हीं सर्व प्रेमाचीं लक्षणं आहेत !

**वाटाणेः**—( आनंदानें ) प्रेमाचीं !

**विनायकः**—हो हो प्रेमाचीं ! बरं पुढलं सांगा ! मग पुढं काय म्हणाली ती !

**वाटाणेः**—पुढं फारच टाकून बोलली ती !

**कृष्णाः**—टाकून बोलली तें आम्हाला ठाऊक आहे रे, पण काय बोलली तें तर सांगशील !

**वाटाणेः**—ती म्हणाली हा असा विदूषकासारखा पोषाख करून तोंडानं

शीळ घालीत माझ्याकडे पहात पहात चालतां चारचौघांत—लाज वाटत नाही तुम्हाला ! फिरून जर असं कराल तर मला कडक उपाय योजावे लागतील !

**विनायकः**—( मोठ्यानें हंसत ) वाटाणे ! अरे अरे अरे ! अहो ही तर सर्वस्वी प्रीतीची भाषा आहे ! या भाषेंत काय साठवलं नाहीं ! तुमच्या वागणुकीचं निरीक्षण आहे, पोषाखाचं परीक्षण आहे ! मैत्रिणिची फसवणूक आहे, तुमची आशा प्रज्वलित केली आहे—तुम्हाला पुढली सूचना देऊन ठेवली आहे ! वाटाणे मला तुमचं नवल वाटतं ! मनुष्य एकदां प्रेमानं आंधळा झाला म्हणजे...

**वाटाणेः**—कृष्णा शंकर खरं का रे हे ! Oh I am happy—happy 'आजि उदेला खचित सौख्य दिन, आनंदवि मन' विनायकराव खरोखरच मी आंधळा झालों असलों पाहिजे म्हणून मला शब्दांचे अर्थ बरोबर दिसले नाहीत ! Excuse me for my bad Marathi ! माझी मराठी भाषा थोडी कच्चीच राहून गेली—हा केवळ इंग्रजी भाषेच्या आवडीचा परिणाम ! विनायकराव मला तिच्या बोलण्यांतला अर्थ स्पष्ट करून सांगा !

**विनायकः**—हें पहा वाटाणे, उषा बागेंत होती, हेवेखोर मैत्रिणीबरोबर होती—ही गोष्ट तुम्हाला विसरून चालणार नाहीं ! या असल्या मैत्रिणी-बरोबर असतांना ती जास्त काय बरं बोलणार ? मैत्रिणीला संशय येऊं नये म्हणून ती तुम्हाला चष्म्यावरून, पोषाखावरून, तुमच्या शिळेवरून, चालण्याच्या ढबीवरून सर्वांवरून टाकून बोलली ! पण त्यांत अत्यंत खोल अर्थ आहे !

**वाटाणेः**—तो कसा !

**विनायकः**—अहो तिच्या बोलण्याचा भावार्थ असा कीं या सर्व गोष्टी माझ्या लक्ष्यांत आल्या आहेत; पण नीट एकांतांत ज्या गोष्टी करायच्या त्या चारचौघांत काय करतां ! असं सुचवते आहे ती तुम्हाला !

**वाटाणेः**—ओहोहो ! म्हणजे मी एकांतांत जाऊन तिची गांठ घ्यावी असा या बोलण्याचा Secret अर्थ दिसतो आहे एकूण ! विनायकराव You are master of Marathi ! तुम्ही मराठी भाषेचे मेंढपाळ आहांत !

**शंकरः**— } मेंढपाळ ! !<br>**कृष्णाः**— }

**वाटाणेः**—अरे गांवढळांनो तो शब्द मीं बायबलवरून घेतला आहे !

**कृष्णाः**—अस्सं !

**वाटाणेः**—विनायक मी अस्सा जातों, अन् तिची आत्तांच्या आत्तां भेट घेतों.

( जाऊं लागतो. विनायक त्याला थांबवतो )

**विनायकः**—हो हो वाटाणे ! पण जरा दमानं घ्या !

**वाटाणेः**—( आठवून ) पण विनायकराव, ती म्हणाली यापुढं जर फिरून लघाळपणा कराल तर मला कडक उपाय योजावे लागतील ! प्रिन्सीपॉलला तर नाहीं ना सांगणार ?

**विनायकः**—अहो ही पुढली सूचना आहे तुम्हाला ! जास्त लघाळपणा म्हणजे तुमचा तिच्याशीं पत्रव्यवहार, आणखी कडक उपाय म्हणजे लग्न ! आणखी हें सारं करा असं सुचवते आहे ती तुम्हाला !

**कृष्णाः**—हा भाषेचा प्रकार तुला ठाऊक नाहीं हें तिला काय बरं माहीत !

**शंकरः**—अरे याला मराठींत वक्रोक्ति अलंकार म्हणतात !

**कृष्णाः**—उषा चांगली विद्वान् आहे वाटाणे ! ती कांहीं तुझ्यासारखी अडाणी नाहीं !

**विनायकः**—पुरेरे ! किती फाजीलपणा करतां तुम्ही !

**वाटाणेः**—( आपल्याच नादांत धुंद राहून ) Oh Sublime ! Sublime ! काय चतुर पोर आहे ! काय चतुर पोर आहे ! म्हणजे याच्या पुढला सर्व संबंध पत्रव्यवहारांत करावा अशी सूचना आहे तर एकूण ! चला आत्तांच्या आत्तां ! ( खिशांतून कागद काढतो ) विनायक पत्र मराठींत कीं इंग्रजींत !

**विनायकः**—मराठींत !

**वाटाणेः**—पण मला मराठी धड येत नाहीं, माझी इंग्रजीवर जास्त Command आहे !

**कृष्णाः**—ठाऊक आहे, ठाऊक आहे बरं का आपलं इंग्रजीवरचं प्रभुत्व !

**शंकरः**—परिक्षेंत आपल्याला इंग्रजींत किती मार्क मिळतात ते ठाऊक आहे बरं का आम्हाला !

**वाटाणेः**—बस्स् ! मार्कांचा योग्यतेशीं कांहीं संबंध नाहीं ! हं विनायक तूं सांग मी लिहीतो ! आपलं काय मराठींत तर मराठींत !

**विनायकः**—ठीक आहे, लिही "प्रियतमे ! चंद्र आणि कुमुदिनी एकमेकांवर कितीही रुसलीं तरी चंद्राचे किरण कुमुदिनीचा सुवास सारखा लुटीत असतात !"

भेटीची आशा करणारा

तुझा प्रियकर

**वाटाणे.**

**वाटाणेः**—काव्य ! काव्य ! विनायक तूं कवि आहेस ! You are a poet ! you are a friend ! विनायक, आजपर्यंत मी मनापासून तुझा द्वेष करीत आलों आहे याबद्दल क्षमा कर ! You are generous ! generous !

**विनायकः**—त्यांत काय आहे मोटंसं ! खऱ्या प्रेमाची प्राप्ती होण्याकरतां अगोदर कडाक्याचं भांडणच व्हावं लागतं !

**कृष्णाः**—अरे ए, अगोदर तें पत्र उषाच्या हातीं लवकर पडेल अशी व्यवस्था करायची टाकून आभारप्रदर्शनांत कसला वेळ घालवतां !

**शंकरः**—त्यांत काय कठीण आहे ! वाटाणे करील ती व्यवस्था.

**वाटाणेः**—दे ते इकडे ! छान सुवासिक कव्हरमध्यें घालून पाठवतों तिच्याकडे माझ्या बॉयबरोबर !

**शंकरः**—मग लवकर पाठव, म्हणजे संध्याकाळच्या आंत उत्तर येईल कदाचित्.

**वाटाणेः**—असं ! हा गेलोंच ( जातो )

**कृष्णाः**—विनायक, पुढें काय ?

**विनायकः**—पुढें काय ! एकदां उषाच्या हातांत त्याच्या सहीचं पत्र पडलं म्हणजे उर्मिला आणखीन् उषा त्याची परस्पर खरडपट्टी काढतील.

**शंकरः**—छे: ! हा तर नुसता फुसका बार होईल. आपण नाहीं एवढ्यावर खूष !

**कृष्णाः**—( नवीन सुचल्यासारखें दाखवून टाळी वाजवून ) मला एक कल्पना सुचली आहे. आपण काय करावं, कीं, वाटाणेच्या पत्राला उत्तर म्हणून उषाचं पत्र तयार करावं, आणखीन् तें त्याला एका तासाभऱ्यानं नेऊन द्यावं !

**विनायकः**—वेड तर नाहीं लागलं तुम्हाला ! खोटं कां होईना पण उषाच्या हातचं पत्र जर त्याच्या हातीं पडलं, तर तो गाढव दुरुपयोग केल्या-शिवाय का राहील त्याचा ? माकड आहे तें एक, सर्व गांवाला दाखवत सुटेल !

**शंकरः**—आले लेकाचे नेहमींप्रमाणें वेदान्तावर !

**कृष्णाः**—अरे त्या पत्रावर 'उषा' अशी सही नाहीं करायची ! कांहींतरी काव्यमय सही करायची—उदाहरणार्थ 'कुमुदिनी'.

**शंकरः**—पण मजकूर काय लिहायचा त्या पत्रांत ?

**कृष्णाः**—अरे मजकूर काय ? त्याला बोहऱ्याच्या वेषांत सिनेमाला या अशी विनंति करायची, आणखी मी सुद्धां लोकांनीं ओळखूं नये म्हणून बोहऱ्याच्या बायका घेतात तशी ओढणी पांघरून येईन, असं तिच्याकडून आश्वासन द्यायचें.

**शंकरः**—काय डांबीस आहेस रे तूं कृष्णा ! बरं पण समजा त्यानं यायचं कबूल केलं तर !

**कृष्णाः**—तर काय तूं ओढणी पांघरून उषेची बतावणी करायची ?

**शंकरः**—Grand ! Grand ! काय विनायक ! आहे कीं नाहीं डोकं ?

**विनायकः**—डोकं आहे ! पण मेंदू बिंदू कुछ नही !

**कृष्णाः**—मग बोल, आहे का तुला कबूल !

**विनायकः**—मूर्ख आहांत तुम्ही ! ( एकदम निघून जातो )

**शंकरः**—अलीकडे बावचळला आहे अगदीं हा ! कृष्णा, आपला डाव फसणार असं वाटतं !

**कृष्णाः**—अरे, फसतो आहे कसला! मी त्याला आणतो; वेळ पडल्यास त्याला असं सांगीन कीं, मजेकरतां येऊं नकोस, पण निदान वाटाणेच्या हातांतलं तें पत्र काढून घेण्याकरतां तर येशील?

**शंकरः**—( आनंदित होऊन ) तर मग येईल कदाचित्.

[ जाऊं लागतात. पडदा पडतो ]

---

## अंक ३ रा–प्रवेश २ रा.

[ **स्थळः**—सिनेमाच्या शेजारची बाग, पलीकडे सिनेमाच्या बागेंत कांहीं प्रेक्षक इकडे तिकडे फिरत आहेत; इतक्यांत विनायक, कृष्णा, वाटाणे प्रवेश करतात. बांकाच्या एका टोकाशीं एक बुरखा घेतलेली बाई बसली आहे ]

**वाटाणेः**—शंकर कुठं दिसत नाहीं तो?

**कृष्णाः**—अरे त्याचं नेहमीचं कांहीं तरी निघायचं! बसले असतील वडलांचं डोकं धरून!

**वाटाणेः**—विनायक ओहो ती पहा, ती पहा, Oh Punctual to the minute! दोस्त "आज उदेला खचित सौख्य दिन, आनंदवि मन"—हु:श! हु:श! ती पहा इकडेच पहात आहे! विनायक या आनंदाला सर्वस्वी कारण तूं आहेस! दोस्त लग्न झाल्यावर माझा दरवाजा नेहेमीं तुला खुला राहील.

**विनायकः**—अं! खरं हें! Thank you, Thank you पण हें पहा वाटाणे! आतां जरा नीट ऐटीनें वागा! आणखीन् जरा गुजराथींत बोलण्याचा प्रयत्न करा! नाहीं तर फुकट कुणाला संशय यावयाचा!

**वाटाणेः**—पण म्हने तो गुजराथी आवतोच नथी! तने सूं करवूं?

**विनायकः**—सूं करवूं ते माहीत नथी! पण तमने गुजराथीमाच बात करवी जोईये!

**कृष्णाः**—एम तो खरूं छे.

[ सर्वजण हंसतात ]

**कृष्णाः**—( वाटाणेच्या खांद्यावर हात ठेवून ) ए तूं असा कुबड काढून बावळटासारखा उभा राहूं नकोस !

**वाटाणेः**—( चिडून हळूच ) बायकांच्या समोर असा खांद्यावर हात काय ठेवतोस ! सर्व कोटाला सुरकुत्या पडल्या ना माझ्या ! I say Krishna you have to learn manners ! तुला कांहीं चालरीत आहे कीं नाहीं !

**कृष्णाः**—( मोठ्यानें ) खरंच ! चुकलो मी माफ कर ! आणखी ती तुझी कोटाची वरची गुंडी उघडी राहिली ना ! हें असं नाहीं रे बाबा कामाला यायचं ! अशानं तर तुमच्यावरचं तिचं सारं प्रेम उडून जाईल ! तरुण पोरींचं सारं लक्ष्य तर या मॅनर्सवर आणखी पोषाखावर !

**विनायकः**—कृष्णा, असूं दे ! ती गुंडी मोकळीच बरी. त्याच्या योगानं आंतली ही हिऱ्यासारखी चमकणारी कांचेची खोटी गुंडी लुकलुक करतांना किती नामी आणि उठावदार दिसते आहे. आणखीन् तो सर्पवर्ण नेकटाय् तर आकाश-गंगेसारखा खुलून उठतो आहे ! वाटाणे तुझा मला हेवा वाटतो !

**वाटाणेः**—Thank you ! Thank you ! ! That is a Compliment ! पण विनायक तिच्याशीं मी बोलायला सुरवात कशी करूं !

**कृष्णाः**—अरे वेडगळा ! तुला गुजराथींत बोल म्हणून किती वेळां सांगितलं !

**वाटाणेः**—हां हां ! एम तो खरूं छे !

**विनायकः**—खरूं सूं छे ! तुम्हाला ' एम तो खरूं छे ' याशिवाय गुजराथी भाषेंतील एक वाक्यसुद्धां बोलतां येत नाहीं असं दिसतं ! वाटाणे सावधपणानं वागा बरं, नाहीं तर वेषांतर केल्याबद्दल पोलीसच्या तावडींत जावं लागेल !

**वाटाणेः**—अरे बापरे ! खरं कीं काय ? विनायक तिला सांग आपण दुसरा कांहीं तरी उपाय शोधूं पण......

**कृष्णाः**—ए मूर्खा ! केवढ्यानं मराठींत बोलतो आहेस ! आमच्या सर्वांच्या गळ्याला फांस लावशील तूं !

**वाटाणेः**—ते तो खरूं छे ! पण हूं सूं करूं ! मने तो गुजराथी आवतो नथी ! आणि आठे हा विनायक तो मने पोलीसना धाक आपशे ! ( घंटा वाजते )

**विनायकः**—वाटाणे ती पहा घंटा वाजली, चल लौकर बोल तिच्याशीं; तिला विनंती कर चल आंत म्हणून ! ते पहा सर्व लोक आंत गेले !

**वाटाणेः**—( कपडे सावरीत सावरीत तिच्याजवळ जातो ) I say miss उषाताई.

**विनायकः**—( त्याला टोंचून ) ए वेडगळा, बोहऱ्यांच्या बायकांना कधीं इंग्रजी येतं कां !

**वाटाणेः**—ते पण खरूंच ! ( हळूच विनायकास ) पण कायरे Sweet heart ला गुजराथींत काय म्हणतात !

**विनायकः**—( विचार करून ) बायडी !

[ कृष्णा मोठ्यानें हंसतो, विनायक त्याला डोळ्यानें दाबतो ]

**वाटाणेः**—( कृष्णाकडे वळून ) ए जंगली ! ( उषाकडे वळून ) मारी बायडी, चालो अबे आपन सिनेमा देखनेको जावां चालो. एटली फ्रायटन थवानों कारण नथी. तेमा काईपण फिअर नथी !

**शंकरः**—( उषासारखा आवाज काढून ) माझं आपल्यावर प्रेम आहे ही गोष्ट खरी !

**वाटाणेः**—( आनंदित होऊन ) काय ! प्रेम आहे ! विनायक, कृष्णा,—मित्रानों—अरे शंकर कुठे आहे, त्याला सांगू दे—

**कृष्णाः**—ए मूर्खा ! तिला उत्तर द्यायचं टाकून आम्हाला काय मिठ्या मारतोस !

**वाटाणेः**—हो, हो; खरंच ! उषाताई, तुम्ही मला किती सुखी केलं आहेत !...

**उषाः**—पण तुमच्यापासून मला कांहीं बाबतींत फार त्रास होतो. तुम्ही पुढच्या बाकावर बसता म्हणून माझ्या मैत्रिणी माझी थट्टा करतात !

**वाटाणेः**—उद्यापासून मागें बसेन. कधीं पुढल्या बाकावर येणार नाहीं.

**उषाः**—तो सर्पवर्ण नेकटाय घालतां !

**वाटाणेः**—घरीं गेल्याबरोबर—आत्तां फाडतों हवातर !

( नेकटाय काढून कृष्णाच्या हवालीं करतो )

**उषाः**—तुम्ही फार मुलींवर प्रेम करतां !

**वाटाणेः**—मी नाहीं करीत ! त्या माझ्यावर करतात त्याला मी काय करूं ?

**उषाः**—तुम्ही फार सुंदर आहांत.

**वाटाणेः**—(आनंदानें) कृष्णा, विनायक,—(पुन: बुरखावालीकडे पहात) खरं आहे तें.—मला ठाऊक आहे तें—म्हणूनच या पोरींच्या जाचांतून सुटण्या-करितां मी कित्येक वेळां भांग काढीत नाहीं, कपडे जुने घालतों !

**उषाः**—अहो त्यानेंसुद्धां सौंदर्य वाढतें कित्येक वेळां.

**वाटाणेः**—तीच तर अडचण आहे !

**उषाः**—पण त्या अडचणींतून कांहीं तरी मार्ग काढला पाहिजे—तुमचं रूप थोडं तरी बिघडवलं पाहिजे !

**वाटाणेः**—( हळूच विनायकास ) फारच हेवा वाटतो आहे तिला इतर मुलींचा !

**कृष्णाः**—( मोठ्यानें ) हेवा कसला ! तूं दिसतोसच सुंदर—आतां यावर उपाय काय करायचा तें तिलाच विचार.

**वाटाणेः**—तेंहि खरंच ! ( शंकरच्या जास्त जवळ जाऊन ) म्हटलं तुम्ही उपाय सुचवा. मी ताबडतोब अमलांत आणतों.

**शंकरः**—( एकदम त्याच्याजवळ जाऊन बुरखा बाजूला फेकून ) लेका—उपाय काय ! भिवया काढून टाक ! ( डोकें धरून त्याचें तोंड एकदां विनायक व एकदां कृष्णा यांचेकडे करून ) बघा लेकाचं तोंड बघा—काय ध्यान आहे, हा म्हणे सुंदर !

**वाटाणेः**—( कांहीं वेळ थक्क होऊन व शेवटीं सारा प्रकार लक्षांत येऊन ) You pack of Scoundrels ! You Villains ! बदमाष ! हलकट ! All right ! मी अस्सा प्रिन्सिपॉलकडे जातो, आणखीन् त्याला

सर्व हकीकत सांगतों ! माझी परिक्षा ! माझी बिलं ! विनायक You Villains, You Serpent ! या बोहऱ्याच्या पोषाखाचं मी काय करूं ? माझे सारे पैसे नासले; बोल या पोषाखाचं काय करूं !

**कृष्णाः**—( हंसत ) आपल्या अकलेचे तारे कसे तुटले होते त्याची खूण पटण्याकरतां रात्रंदिवस आपल्या डोळ्यांसमोर टांगून ठेव !

**शंकरः**—उषा पाहिजे नाहीं का ! विनायक खरं सांगू का तुला, हा क्लास मध्यें आल्याबरोबर तिच्या तोंडावर तिरस्काराची छटा स्पष्ट दिसते !

**वाटाणेः**—तिरस्कार ! अरे बेरडांनो ! तुम्ही मला फसवलंत ! तुम्ही खात्रीनं माझं पत्रच तिला पोंहोंचूं दिलं नाहींत ! तिचं माझ्यावर प्रेम आहे ! I know she loves me ! नाहींतर ती माझ्याशीं इतक्या सलगीच्या शब्दांत कशी बोलली असती रागानं !

**विनायकः**—शंकर, कृष्णा त्याला चिडवूं नका ! अशा वाईट प्रसंगीं त्याला आपण मदत केली पाहिजे !

**वाटाणेः**—Damn your help ! तूं मला मदत करणार ? थांब हा आतां सरळ प्रिन्सिपॉलकडे जातो !

**शंकरः**—पण जायच्या अगोदर तेवढीं तिकीटं इकडं दे म्हणजे आम्हाला तरी सिनेमा पाह्यला मिळेल !

**कृष्णाः**—खरंच ! उगीच कशाला पैसे तरी वाया घालवायचे !

**वाटाणेः**—ठीक आहे; उद्यां तुम्हां दोघांना रस्टीकेट करवतो ! विनायक तूं बी. एस्‌सी. झालास म्हणून सुटलास असं समजूं नकोस ! तुझ्यावर फिर्याद लावतो !

**विनायकः**—( हंसत ) वाटाणे असं कांहीं तरी करूं नको बरं वेड्यासारखं! नाहींतर मॅजिस्ट्रेट आमच्या ऐवजीं तुलाच तुरुंगांत पाठवील, कारण सारा पुरावा तुझ्याविरुद्ध आहे. हें पाहिलंस उषाला पहिलं पत्र तूं पाठवलं आहेस !

**वाटाणेः**—ठीक आहे ! पण मॅजिस्ट्रेटला मी सारी खरी हकीकत सांगेन कीं तुम्ही—तूं, तूं, तूं मला हे सारं करायला भाग पाडलंस म्हणून !

**कृष्णाः**—( हंसत ) मॅजिस्ट्रेट कांहीं तुझा आजोबा नाहीं लागला तूं सांगशील त्या साऱ्या गोष्टी खऱ्या मानायला !

**विनायकः**—चल वाटाणे......

**वाटाणेः**—( चिडून ) एक शब्द बोलाल आतां कोणी तर खबरदार ! लक्ष्यांत ठेवा, निदान प्रिन्सिपॉल जवळ तरी तुमची नाचक्की करीन !

**शंकरः**—त्यांत तुझीच नाचक्की होईल !

**वाटाणेः**—कांहीं हरकत नाहीं ! सर्व कॉलेजांत मी ही गोष्ट पसरवतो !

**विनायकः**—वाटाणे लक्ष्यांत ठेव, यांत आमची तर कांहींच नाचक्की होत नाहीं, पण तुझी मात्र पुरती फट्फजिती होईल—पण तूं बेशरम आहेस म्हणा—माझं म्हणणं तुला ऐकायचं असेल—मी तुला विनंती करतो वाटाणे, यांत बिचाऱ्या उषाचं नांव बांधलं गेलं आहे हे ध्यानांत घे, आणखी ज्यास्त आचरटपणा बंद कर !

**वाटाणेः**—ठीक आहे ! कर विनंती ! विनंती करायला मी मना करीत नाहीं, पण मी तुला बजावतो तुझी विनंती आम्हाला मान्य नाहीं !

**विनायकः**—पहा बरं वाटाणे !

**वाटाणेः**—अरे जा जा ! हा पहा आतांच प्रिन्सिपॉलकडे जातो.

[ जाऊं लागतो, इतक्यांत पोलीस अधिकाऱ्याच्या पोषाखांत प्रभाकर एका शिपायासह प्रवेश करतो ]

**प्रभाकरः**—ए बोहोरी ! ठहरो !

**वाटाणेः**—( घाबरून ) कोण मी बोहरी ? पण इन्स्पेक्टर साहेब मी बोहरी नाहीं !

**प्रभाकरः**—म्हणूनच तुला कैद करण्याचं हें वॉरंट आणलं आहे. ( त्याला खोटं वॉरंट दाखवितो ) चल ए पोरा कोणाला गंडा घालायचा बेत होता तुझा ? चल बोल कोणाला लुबाडणार होतास ?

**वाटाणेः**—( अर्धवट भीत, अर्धवट हंसत ) छे छे ! साहेब मी गमतीनं हा पोषाख केला आहे !—म्हटलं सहज करमणूक करावी !

**प्रभाकरः**—चूप रहो साला बदमाष ! ए बम्मन, जर खोटं बोललास तर इथल्या इथं फटके मारीन या फाटकाशीं बांधून !

**वाटाणेः**—( एकदम बसतो ) अरे बापरे—विनायक आतां कसं रे ?

**शंकरः**—
**कृष्णाः**— } प्रिन्सिपॉलकडे जा ! !

**विनायकः**—हें पहा इन्स्पेक्टर साहेब, आम्ही या गृहस्थांचे मित्र आहोंत; यांचं कॉलेजमधल्या एका मुलीवर प्रेम आहे; आणखीन् त्यांचा दोघांचा येथें बोहोऱ्याच्या वेषांत भेटण्याचा संकेत ठरला होता !

**प्रभाकरः**—काय ! संकेत ठरला होता ! तिला पळवायचा बेत होता याचा एकूण ! हें तर चोरीहूनही फार वाईट ! ( वर पाहून आपल्याशींच पुटपुटतो ) कलम ३६६—Abduction दहा वर्षे शिक्षा !

**वाटाणेः**—अरे बापरे विनायक !

**प्रभाकरः**—ते असो ! पण मला तुम्हा बाकी तिघांना एक सवाल विचारायचा आहे ! तुम्ही तिघांनीं याला या कामांत मदत केलेली दिसते !

**विनायकः**—छे छे ! तुमचा उलट समज झाला. आम्हाला ही बातमी कळल्याबरोबर आमच्यापैकीं एकानं ( शंकरकडे बोट दाखवतो ) बुरखा घेऊन तिची बतावणी केली, आणखी आमच्या या मित्राला व त्या मुलीला बेअब्रूतून वाचवलं !

**प्रभाकरः**—शाबास ! तुम्ही योग्य तऱ्हेनं वागलांत ? बरं यांचं नांव काय ?

**वाटाणेः**—( दीन मुद्रेनें विनायकाकडे पहातो ) नकोरे !

**विनायकः**—फौजदारसाहेब ! आतां या गोष्टी जास्त कशाला वाढवतां !

**प्रभाकरः**—त्याची उठाठेव आपल्याला कशाला ! कायदा तो कायदा ! चला बोला यांचं नांव काय ?

**कृष्णाः**—विनायक, आपल्याला कायद्याला मदत केलीच पाहिजे !

**शंकरः**—बरोबर, शिवाय वाटाण्याला सुद्धां कायदा फार आवडतो ! मघाशीं नव्हता का तो आपल्याला धाक घालीत फिर्याद करण्याचा !

**वाटाणेः**—( रडत ) अरे मी ती थट्टा केली होती रे !

**प्रभाकरः**—काय ! फिर्याद करण्याचा धाक घालीत होता ? तें काय म्हणून ?

**विनायकः**—कांहीं नाहीं ! आम्ही त्याचे बेत फसवले म्हणून !

**प्रभाकरः**—हें तर फारच वाईट ! मॅजिस्ट्रेट फारच वाईट View घेईल एकंदर या केसचा ! I say Mr. काय नांव यांचं ?

**शंकरः**—दिनानाथ गणेश वाटाणे.

**प्रभाकरः**—दहा वर्षे मिळतीलसा रंग दिसतो तुम्हाला मिस्टर वाटाणे ! I am sorry for you !

**विनायकः**—इन्स्पेक्टरसाहेब मी आपणाला विनंती करतो, आपण याला क्षमा करा ! याचं वय लहान आहे, आणि शिवाय तो माझा मित्र आहे ! आम्ही गुन्हा होऊं दिला नाहीं म्हणजे एकापरीनं कायद्याला मदत केल्यासारखीच आहे ! वाटाणे इन्स्पेक्टरसाहेब सज्जन दिसतात ! त्यांच्या पायां पड !

**वाटाणेः**—मला क्षमा करा, मी चुकलों !

**प्रभाकरः**—कायदा मोडल्याबद्दल कांहींतरी शिक्षा दिलीच पाहिजे ! चल आत्तांच्या आत्तां, इथल्या इथं दहा उठाबशा मार !

**कृष्णाः**—काय साऱ्या दहा उठाबशा ?

**शंकरः**—एवढ्या घोर अपराधाबद्दल दहा उठाबशा ?

**कृष्णाः**—<br>**शंकरः**— } छे ! ही शिक्षा आम्हाला पसंत नाहीं ! !

**वाटाणेः**—असं काय करतां रे कृष्णा, शंकर !

**प्रभाकरः**—ठीक आहे; मी एकदां बोललों तें बोललों, चल मार दहा उठाबशा !

**वाटाणेः**—पण साहेब लहान मुलासारख्या उठाबशा—

**प्रभाकरः**—एकंदरींत तूं मोठा मनुष्य आहेस तर ! ठीक आहे तुला मोठ्या माणसासारखी शिक्षा देतो. शिपायी ! घाल बिड्या याच्या हातांत !

**वाटाणेः**—नाहीं नाहीं ! मारतो उठाबशा ! ( उठाबशा मारतो )

**प्रभाकरः**—ए नीट बसत जा न् मग उठत जा !

**वाटाणेः**—साहेब, माझी पँट आडवी येते हो, म्हणून धड बसतां येत नाहीं ! त्याला मी काय करूं ? ( रडतो )

**शिपाईः**—जाने देव साहेब ! नहीं तो पॅन्ट बिगाड देगा !

**प्रभाकरः**—बरं बरं ! पुरे कर ! तुला पश्चात्ताप झालेला दिसतो ! काढा सारी पुराव्याची पत्रं काढा कोणाकोणाजवळ आहेत तीं ! ( विनायक, वाटाणे पत्रें काढून देतात तीं घेऊन वाटाणेला ) लक्ष्यांत ठेव जर त्या पोरीच्या नावानं कुठं बोभाटा केलास तर या पत्रांच्या जोरावर तुला ताबडतोब कैद करीन ! आणखीन् या तुझ्या मित्रांचे आभार मान ! Good night to you Gentlemen ! ( जातो. )

**वाटाणेः**—विनायक ! तूं माझा खरा मित्र आहेस !

**विनायकः**—ठीक आहे ! पुनः कधीं उषाचं नांव काढलं नाहींस तर आपली मैत्री कायम राहील !

**वाटाणेः**—पण विनायक, तिचं माझ्यावर खरंच प्रेम आहे !

**विनायकः**—असं का ! ठीक आहे; आपली मैत्री तुटली—या घटकेपासून—कृष्णा धांव त्या इन्स्पेक्टरसाहेबांना बोलाव !

**वाटाणेः**—( घाबरून ) नको नको ! तिचं माझ्यावर प्रेम नाहीं ! मी कबूल करतो !

**विनायकः**—लक्ष्यांत ठेव ! आजपासून एकाही स्त्रीचं तुझ्यावर प्रेम नाहीं, आणि पूर्वी कधीं नव्हतं आलं लक्ष्यांत !

**वाटाणेः**—पण विनायक हें असं खोटं कसं—

**विनायकः**—खोटं ! ठीक आहे तसा नाहीं तूं वठणीवर यायचास ! शंकर—

**शंकरः**—ओ ! काय ? पोलीस इन्स्पेक्टरला बोलवायचं ? हा चाललों !

**वाटाणेः**—नकोरे ! विनायक तुझं म्हणणं सारं मला कबूल आहे !

**विनायकः**—आजपासून कधीं समोरच्या बांकावर बसायचं नाहीं ! सर्पवर्ण नेकटाईज् खरेदी करायचे नाहींत ! सारं कबूल आहे तुला !

**वाटाणेः**—होय होय ! सारं कबूल !

**विनायकः**—ठीक आहे ! हे घे तुझे पन्नास रुपये ! तो ड्रेस मी उसना आणला होता !

**वाटाणेः**—( आनंदानें ) शाबास ! दोस्त शाबास ! मी आत्तां उषाला जाऊन सांगतो ( जीभ चाऊन ) नाहीं नाहीं चुकलों !

**विनायकः**—( हंसत ) ठीक आहे ! सिनेमाच्या तिकीटाचे दहा रुपये तुला दंड ! जा आतां तुम्ही तिघे सिनेमाला ! मला दुसरीकडे काम आहे !

**कृष्णाः**—तूं येत नसलास तर मी सुद्धां जात नाहीं ! शंकरलाच जाऊं दे हवा तर.

**शंकरः**—जसा कांहीं मी एकटाच ह्यापापलों आहे सिनेमा पहायला ! केवढे लेकाचे वैरागी !

**वाटाणेः**—अरे हो हो पण एवढ्या वैराग्याच्या गोष्टी कशाला बोलतां ! साले हो ! माझा एवढा सिनेमा केलात—अन् वर तोंड करून सिनेमा पाह्यच्या गोष्टी सांगतां—तुम्हाला फुकट सिनेमा पाहू देतो आहे मी ! वाट बघा ! ( तिकिटें फाडून त्यांच्या अंगावर फेंकतो व संतापानें निघून जातो. )

**कृष्णाः**—<br>**शंकरः**— } Bravo ! Bravo !

**प्रभाकरः**—( प्रवेश करून दरडावणीच्या स्वरांत ) कायरे पोरांनो ! अजून काय करतां तिथे ! जातां घरीं आपापल्या का लगावू चाबूक ?

**विनायकः**—मला असं सांग प्रभाकर अगोदर, कीं, तूं कसा आलास इथें ऐनवेळीं ?

**प्रभाकरः**—काय डोकं आहे बाळाचें ! स्वतःला बुद्धिवान समजतोस नाहीं खूप !

**शंकरः**—अरे आम्हीं हें अगोदर ठरवलं होतं सारं !

**कृष्णाः**—शंकर, स्वारीचं डोकं आहे जागच्या जागीच ! पण मेंदू बिंदू कुछ् नहीं.

**विनायकः**—( जागा झाल्यासारखें करून ) तुम्हीं हें अगोदरच ठरवलं होतंत !

**प्रभाकरः**—लवकरच उगमलं तें आपल्याला !

( तिघेही हंसतात )

**विनायकः**—I hate you, I hate myself that's all.

( जातो. )

( प्रभाकर, कृष्णा, शंकर एकमेकाकडे पहात उभे रहातात )

**पडदा पडतो.**

---

# अंक ४ था

[ **स्थळः**—बाबासाहेबांच्या माडीचा मुख्य दिवाणखाना. वेळ सकाळ ७. शिवा झाडलोट करीत आहे. उर्मिळा प्रवेश करते ]

**उर्मिळाः**—शिवा !

**शिवाः**—जी !

**उर्मिळाः**—तुझे धाकटे धनी उठले कारे !

**शिवाः**—उठलं !—न्हाई, उठलं न्हाई जी !

**उर्मिळाः**—उठले नाहींत अजून ? ( क्षणभर थांबून ) मग असं कर, उठले म्हणजे मी वर बोलावते आहे म्हणून सांग त्यांना !

**शिवाः**—( जात जात ) हा आतांच पाटवून येतों कीं !

**उर्मिळाः**—छे ! छे ! मुद्दाम उठवूं नको त्यांना !

**शिवाः**—धाकल धनी जागच हैत बाईसाब !

**उर्मिळाः**—जागेच आहेत ! मग आत्तां काय म्हणालास उठले नाहींत म्हणून—थट्टा का करतो आहेस माझी ?

**शिवाः**—बाईसाब् तुमची थट्टा ! या शिवाला गाडाव समजतां व्हय थट्टा कराया ! धाकल धनी जाग हैत त्ये पन् खरं—अन् उटूलं न्हाईत त्ये पन खरं !

**उर्मिळाः**—( त्याचा भावार्थ न समजून किंचित् रागानें ) बरं जा तूं !

**शिवाः**—रागाऊ नका बाईसाब—हा शिवा कदी पन खोटं न्हाई सांगायचा ! मानूस उटायच असल तर निजाया होव ना ? धाकल धनी रातभर निजलच न्हाईत काल—मग उटतील कसं ?

**उर्मिळाः**—निजलेच नाहींत ? मग करीत तरी काय होते ?

**शिवाः**—लिवत व्हते ! अन् वाचत व्हते ! अन् समद्या खोलीभर वाघरावानी हिंडत व्हते ( तिच्याकडे बारकाईनें पहात ) लई दुक्की झाल्याती—अन् तोंड बांदुनशान बुक्क्यांचा मार चाललाया त्येंच्यावर अक्षी !

**उर्मिळाः**—जा तर मग लवकर—त्यांना वर पाठव !

**शिवाः**—जी ! ( जातो )

[ उर्मिळा इकडे तिकडे हिंडत पुस्तक वाचण्याचा प्रयत्न करते. विनायक प्रवेश करतो ]

**उर्मिळाः**—( त्याच्याकडे रोखून पहात ) काल रात्रभर निजलां नव्हतां तुम्ही !

**विनायकः**—कुणी सांगितलं तुला ?

**उर्मिळाः**—तुला !

**विनायकः**—हो हो ! तुला ( विनवणीनें ) उर्मिळा—( तिच्याजवळ जाऊन ) उर्मिळा हा लपण्डाव आपण आतां किती दिवस खेळायचा ! तूं माझ्यावर प्रेम करीत असतां मी दुसऱ्या कोणाशीं लग्न करीन अशी आशा तरी कशी वाटते तुला ?

**उर्मिळाः**—( मन आवरून एक पाऊल मागें घेऊन ) तीं सारीं सुखस्वप्नं आपणाला आतां विसरून गेलं पाहिजे ! तुम्ही उषाला वचन दिलं आहे—तें तुम्हाला पाळलंच पाहिंजे !

**विनायकः**—हे काय वेड डोक्यांत घेऊन बसली आहेस तूं ! मी तुला पर्वाच नाहीं का सांगितलं कीं मी उषाशीं लग्न करायला आतां बांधला गेलेला नाहीं म्हणून !

**उर्मिळाः**—( किंचित् रोषानें ) तुमच्या मनांत जर उषाशीं लग्न करायचं नव्हतं तर तुम्ही या वाटाणेच्या प्रकरणांत कां पडलांत ? तुमच्या या अशा वागण्यानं तिच्या खुरटलेल्या आशेला नवी पालवी फुटली आहे, याची तुम्हाला कल्पना तरी आहे का ?

**विनायकः**—मी तिला आज सारं कांहीं खरं खरं सांगून टाकणार आहे !

**उर्मिळाः**—मी पर्वा तुम्हाला बजावलं, कीं वाटाणेच्या या प्रकरणांत तुम्ही पडूं नका. तें तुम्ही ऐकलं नाहींत—आतां तरी तुम्ही ऐकणार आहांत का माझं ?

**विनायकः**—ऐकण्यासारखं असेल तर ऐकीन !

**उर्मिळाः**—ऐकण्यासारखं असेल तर ! ठीक आहे ! ! मला कांहींच सांगायचं नाहीं ! तुम्हाला काय वाटेल ते करा !

**विनायकः**—पण सांगून तर पहाशील !

**उर्मिळाः**—आज तुम्ही उषाशी कांहींच बोलूं नका—मी अन् उषा उद्यां इथून जातो—उषा नाहीं आली, तर निदान मी तरी जात्येंच—अन् मग तुम्हाला काय सांगायचं आहे तें तिला सांगा !

**विनायकः**—( कांहीं वेळ विचार करून ) माझी तुला एक विनंती आहे उर्मिळे—निदान या वेळीं तरी तूं मला सोडून जाऊं नको ! या वेळीं मी किती दुःखी आहे याची तुला कल्पना आहे का !

**उर्मिळाः**—आपणा सर्वांच्या हिताच्या दृष्टीनं मला हें घर ताबडतोब सोडलंच पाहिजे !

[ निघून जाऊं लागते. इतक्यांत उषा, प्रभाकर, ताई प्रवेश करतात ]

**ताईः**—हें रे काय दादा, तुला चहा ना हवा होता ?

**विनायकः**—हो ! आण कीं इथंच ! अन् उर्मिळाताईंना नाहीं घ्यायचा !

**ताईः**—आमचा चहा राहिला आहे वाटतं अजून !

**विनायकः**—( आयती पळवाट सांपडलेली पाहून ) तुमचा सर्वांचाच झाला असला, तर मी खालीं जाऊनच घेतो. ( जातो )

**प्रभाकरः**—( त्याच्याकडे पहात ) अजून समंध डोकावतो आहे !

**ताईः**—चांगली मात्रा दिल्याशिवाय ताळ्यावर नाहीं यायचा तो ! उषा तूं असं कर—आज त्याला एकट्याला गांठ अन् विचार त्याला सरळ सरळ काय तें !

**प्रभाकरः**—( उर्मिळाकडे पाहून डोळे मिचकावून ) आणखीन् शिवाय कृष्णाकडून मला असंही कळलं आहे कीं तुम्हाला रेसीडेन्सी सोडून जायची नोटीस मिळणार आहे पुढल्या टर्मच्या सुरवातीला !

**उषाः**—मला ? ती काय म्हणून ?

**प्रभाकरः**—तुम्हाला अन् उर्मिळाताईंना दोघींनाही ! कृष्णा, शंकर तर इतके घाबरले आहेत कीं ते इथं यायला सुद्धां कबूल नाहींत !

**उषाः**—( काळजीनें ) हे जर नानांना कळलं तर काय म्हणतील कोण जाणे !

**प्रभाकरः**—तशा घाबरूं नका तुम्ही ! एकतर विनायक सारं आपल्या अंगावर घेऊन तुमचा नक्की बचाव करील—शिवाय मीही प्रिन्सीपॉलची भेट घेऊन मला काय सांगायचं तें सांगीन ! पण तुम्ही या गोष्टीचा फायदा घेऊन विनायकची गम्मत तर करा !

**ताईः**—चांगला जाळ्यांत अडकला आहे दादा ! त्याला बजाव आतां, कीं मी नाहीं एकटी रेसिडेन्सींत राहणार ! मुकाट्यानं लग्न करा, नाहींतर कॉलेजमध्यें जाणंच बंद करीन मी !

**उर्मिळाः**—काय वेड्यासारखं शिकवतेस ग तिला ! अशा धाकानं का कधीं बधणार आहेत ते !

**ताईः**—तुझा बाई आपला नेहेमीं तिसराच पंथ ! बाकी तो बधो वा न बधो, जय हा ठेवलेला ! पण तो कोणाचा हें उषाताई येतं का लक्षांत तुझ्या ?

**उषाः**—कोणाचा ?

**ताईः**—ना तुझा ना दादाचा !

**प्रभाकरः**—वा ! मग कोणाचा !

**ताईः**—निसर्गाचा !

**उषाः**—निसर्गाचा ? तो कसा काय ?

**ताईः**—( हंसत ) ऐका.

**तिजला जणूं छबि आपुली रतिची दुजी प्रत वाटते;**
**मदनाहुनी तिळही कमी निजरूप त्या नच भासतें !**
**नवयौवनीं दोघें जंई हीं एकमेकां भेटती,**
**' जय आपुला ' ही खातरी दोघेंहि चित्तीं मानिती !**
**निजरूप मोहिनि जाल का पसरावया ती लागते;**
**गुलगूल कोमल बोलणीं फांसे तयाचे गोड ते !**
**' जय आपुला '—दुसरा गडी झाला पुरेपुर गारद;**

**—मनिं मानुनी हे पारधी करिती परस्पर पारध !**
**राजा निसर्गा सर्व ही अति थोर गम्मत वाटते,**
**विजयोत्सवीं दोघां बघूं अनिवार हासूं लोटतें !**

**उषाः**—काय वात्रट झाली आहेस ग तूं !

**ताईः**—वात्रट कसली ! वेडे माझ्या बोलण्याचा भावार्थ असा, कीं किल्ला सर झाला आहे, फक्त निशाण चढवायचं शिल्लक राह्यलं आहे !

**उर्मिळाः**—हें पहा यमू, तूं तिला भलभलतं शिकवूं नकोस—उषा, तुला माझं ऐकायचं आहे का ?

**उषाः**—( थट्टेनें ) आपण नाहीं रे बुवा अगोदर वचन देऊन बसत ! काय सांगायचं असेल तें सांग. ऐकण्यासारखं असलं, तर ऐकीन !

**उर्मिळाः**—आपण दोघी आजच्या आज घरीं निघून जाऊं !

**उषाः**—घरीं निघून जाऊं ? कारण ?

**उर्मिळाः**—अगदीं खरं सांगायचं म्हणजे ज्या कामाकरतां आपण दोघी इथं आलों, तें कार्य सफल होत नाहीं, अशी माझी नक्की खात्री झाली म्हणून !

**उषाः**—तुला असं वाटतं !

**उर्मिळाः**—आतां नुसत्या वाटण्याचाच प्रश्न नाहीं राह्यला ! माझी जवळजवळ खात्री झाली आहे !

**प्रभाकरः**—मला नाहीं वाटत तुमच्यासारखं—कारण तसं असतं तर तो या वाटाणेच्या प्रकरणांत पडलाच नसता मुळीं !

**ताईः**—उषा तूं नको ऐकूंग उर्मिळेचं या प्रकरणांत ?

**उषाः**—यमू, तूं चुकते आहेस बरं ! या बाईसाहेबांना जितक्या त्यांच्या स्वभावांतल्या खाचाखोंचा ठाउक आहेत, तितक्या तुम्हा आम्हाला का कळणार आहेत ? उर्मिळाताई म्हणजे त्यांची सर्वांत जुनी आणखीन् आवडती मैत्रिण !

**ताईः**—आवडती मैत्रिण ! मग तिच्याशींच कां नाहीं लग्न केलं त्यानं ?

**उषाः**—एकदां काय झालं; आम्ही फिरायला गेलो होतो, अन् ते जे भरांत आले ते उर्मिळेसंबंधीं एकसारखं बोलत सुटले—उर्मिळेचं वाचन असं, अन् तिचे

विचार असे, अन् तिच्या महत्त्वाकांक्षा अशा ! एक ना दोन एकसारखी उर्मिळा ! उर्मिळा ! ! उर्मिळा ! ! ! ( उर्मिळेकडे पहात हंसत ) अगदीं कुठं ठेऊं अन् कुठं नाहीं असं झालं होतं त्यांना ! ( गंभीर चेहेरा करून ) खरं सांगू का उर्मिळाताई, त्या वेळीं मला तुझा हेवा वाटला आणखी मनांतल्या मनांत चिडलें—चरफडलें—अन् शेवटीं रागावून त्यांना विचारलं, कीं इतकं जर सारखं उर्मिळा, उर्मिळा, उर्मिळा करतां, तर मग तिच्याशींच कां नाहीं करत लग्न ?

**प्रभाकरः**—मग त्यावर काय उत्तर दिलन् त्यानं !

**उषाः**—उत्तर बित्तर कुछ नहीं—नुसता धीरगंभीर चेहेरा ( नक्कल करून दाखवते ). एकदां तर मी फारच चिडले अन् त्यांना सरळ सरळ विचारलं, कीं नेहेमी नेहेमी उर्मिळेसंबंधीं बोलतां एकसारखं माझ्याजवळ—पण मी मात्र तिच्यासंबंधीं एक अवाक्षर बोलल्यें तर एखाद्या रानहरणासारखे बिचकतां—याचा अर्थ काय ? असं विचारलं मात्र, तर जे निघून गेले ते आठ दिवस मला भेटलेच नाहींत—अन् तेव्हांपासून मी नादच सोडून दिला त्या प्रश्नाचा !

**ताईः**—मग उर्मिळेलाच कां नाहीं विचारलंस ?

**उषाः**—विचारलं तर तिनं थाप मारली, कीं आमचं एकमेकांवर अगदीं निःस्वार्थी प्रेम आहे म्हणून ! बाईसाहेबांची एक आवडती कविता नाहीं ठाऊक तुम्हाला ? ( कविता म्हणते )

**साजणीबाई ! झाला उशीर**
**सांग लवलाही ॥ ध्रु० ॥**
**युवराजांची खाशी स्वारी,**
**दारावरुनी आज दुपारीं—**
**जाइल, म्हणुनी तया अवसरीं—**
**लेवुं तरि काई ?**
**अंगीं घालूं काय भूषणें ?**
**केश रचूं ग कुण्या तऱ्हेनें ?**
**तोडे किंवा गेंद पैंजणें—**
**घालुं ग पायीं ? ॥**

आश्चर्यानें होउन बावरि,
बघशी कां गे अशी भिरभिरी ?
बघेल स्वारी कधीं नच वरी !
कळत का नाहीं ? ॥
क्षणांत जातिल नयानापुढुनी—
बघतां, बघतां; मात्र दुरूनी—
मृदु मुरलिध्वनि येइल कानीं,
कळत कां नाहीं !
असो कसेंही; परी तयांची
स्वारी इथुनी आजि जायाची—
वस्त्रभूषणें लेइन उंची—
म्हणुन मी बाई ! ॥

पद्दा असं निर्हेतुक प्रेम आहे बाईसाहेबांचं त्यांच्यावर !

**उर्मिळाः**—आटोपलं तुझं ! आतां माझं ऐकणार आहेस का ?

**उषाः**—( थट्टेनें ) मुळीच नाहीं !

**उर्मिळाः**—ठीक आहे ! मी आपली जाण्याची तयारी करते. आणखी उषा, मी तुझ्या घरीं येणार होते, तीं सुद्धां पुढं मागं येईन केव्हां तरी— आज ताबडतोब मी घरीं निघून जाणार—

[ एकदम् निघून जाते ]

**उषाः**—उर्मिळा ! ए उर्मिळाताई—असं ग काय करतेस अगदीं ?

**ताईः**—जाऊं दे ग तिला—तिचं नेहेमीचंच आहे तें ! प्रत्येक बाबतींत स्वच्छंदी !

**उषाः**—तें कांहीं असलं, तरी तिला अडवलंच पाहिजे—ही आल्येंच मी. ( जाते )



अंक ४ था ] **ताई:**—तुम्हाला सुद्धां ऐकेनासा झाला आहे तो अलीकडे ! [ पान ८९
तो माझं ऐकणार ?

**प्रभाकरः**—यम्, तुला खरोखरच वाटतं विनायकाचं उषावर प्रेम आहे म्हणून ?

**ताईः**—आपल्याला संशय वाटतो कीं काय ?

**प्रभाकरः**—मला फार दिवसापासून असं वाटतंय, कीं त्याचं उषेवर प्रेम नसून उर्मिळेवर आहे. अन् आतां उषेच्या बोलण्यावरून तर माझ्या कल्पनेला पुष्टी मिळते आहे !

( बाबासाहेब प्रवेश करतात )

**बाबा०ः**—विनायक नाहीं इथं ?

**ताईः**—इतक्यांतच खालीं गेला.

**बाबा०ः**—मग दिसला नाहीं मला तो कुठं आपल्या खोलींत ? आणखीन् हो, तें पर्वाचं तर राहूनच गेलं अर्धवट—काय ठरलं ? काय म्हणतो विनायक लग्नासंबंधीं ?

**प्रभाकरः**—नक्की असं कांहींच बोलत नाहीं !

**बाबा०ः**—तुम्ही बोलावं कीं नाहीं त्याच्याशीं उघड उघड त्या विषयावर ?

**प्रभाकरः**—बोललों ! पण तो उडवाउडवी करतो !

**बाबा०ः**—काय ग पोरी ! अन् तूं काय करते आहेस ? नाहींतर एरवीं घालत बसाल गळ्यांत गळे भाऊबहिणी—पण ज्या वेळेला त्याला हुडसून खडसून विचारायचं लग्नासंबंधीं—

**ताईः**—मला का दाद देणार आहे तो ! परवां मी त्याला बोलायला गेले, तर मला 'गुलाम' म्हणाला ! तुम्हाला सुद्धां ऐकेनासा झाला आहे तो अलिकडे—तो माझं ऐकणार ?

**बाबा०ः**—मला ऐकत नाहीं ?—मला ! पहातो कसा ऐकत नाहीं तो ! प्रभाकरपंत, त्याला जरा वर पाठवा बरं ! अन् ए पोरी, तूंही जा थोडी खालीं—मला त्याच्याशीं एकटं बोलायचं आहे !

[ प्रभाकर, ताई जातात. बाबासाहेब विनायकाची वाट पहात इकडे तिकडे हिंडतात. त्याला यायला वेळ लागतो म्हणून, आपल्या आसनापाशीं

जाऊन वहीखातें पहाण्याचा प्रयत्न करतात—व शेवटीं कंटाळून हाका मारतात—" शिवा ए शिवा. " शिवा येतो ]

**शिवाः**—जी !

**बाबा०ः**—शिवा ! तुझे धाकटे धनी आहेत का घरांत ?

**शिवाः**—कोन ? इनायकराव ? हैत हैत !

**बाबा०ः**—विनायकराव ! विनायकराव ! !

**शिवाः**—व्हय धनी ! इनायकराव ! त्यान्नी धाकलं धनी कोनच्या तोंडानं म्हनूं ? तुमीच तर सांगितलं व्हतं, कीं या घरांत धनी योक है ! अन् मी खरं समजलों !

**बाबा०ः**—हं अक्कल नको दाखवूंस फार ! कान लांब होत चालले आहेत तुझे ! काय करतो आहे विनायक ?

**शिवाः**—कविता लिवत बसले हैत !

**बाबा०ः**—कविता ! तुला कसं समजलं कविता लिहीतो आहे म्हणून ?

**शिवाः**—( अभिमानानें ) वाचूनशान् दाकवत्यात मला ! त्यांच्या दोन काप्या हैत धनी ! येक येसपेरीमीट लिवायची—अन् दुसरी कविता लिवायची !

**बाबा०ः**—अस्सं !

**शिवाः**—धाकलं धनी रागावलं, पिरींत करूं लागलं, दुकी झालं कीं कविता लिवत्यात ! अन् मजेमंदी असलं, म्हनूजे अक्षी येसपेरिमिंट करत्यात !

**बाबा०ः**—एक्सपेरीमेंट !—म्हणजे गुडगुडी ओढायचा !—अन् तूं त्याला मदत करतोस त्या कामांत !

**शिवाः**—तसं नव धनी !

**बाबा०ः**—चल फाजिल बोलूं नको—जा त्याला वर पाठव !

**शिवाः**—( त्याला इशारत देत ) धनी ! जरा धाकल्या धन्यासंग दोन चार दीस ब्येताबातानं ! न्हाई तर सांगितलं न्हाई म्हनाल !

**बाबा०ः**—बेताबातानं ! कारण ?

**शिवाः**—धाकल धनी रागावल हैत—अन् दुकी हैत—अन् पिरेम पन् करत्यात् ?

**बाबा०ः**—प्रेम करतात ! कोणावर ?

**शिवाः**—त्योच तर बिकट परश्न हाय धनी ! माझी अक्कल अक्षी गुंग झालीया ! डोस्क्यांत कांहीं उतरतच न्हाई ! पिरेम करत्यात हे खरं—पन कुनावर, त्ये न्हाई सांगता येत !

**बाबा०ः**—चल गाढव आहेस तूं ! जा त्याला वर पाठव !

**शिवाः**—( मान हलवीत ) धाकट धनी घर सोडूनशान् ग्येल, तर आपल्याकडे काई न्हाई !

( कानावर हात ठेऊन निघून जातो )

**बाबा०ः**—( स्वगत ) काय आहे तरी काय ही भानगड !

[ इकडे तिकडे पहात अस्वस्थ मनानें फिरतात. विनायक प्रवेश करतो—तो अगदीं शांत असून यत्किंचित्‌ही बेभान नाहीं ]

**विनायकः**—काय बाबा ?

**बाबा०ः**—( त्याच्याकडे रोखून पहात ) विनायक ! तुझं लग्न ठरलं !

**विनायकः**—माझं लग्न ठरलं ! मला सांगितल्याशिवाय ?

**बाबा०ः**—आत्तां सांगतो ना ठरलं म्हणून !

**विनायकः**—ठरलं तर आनंदच आहे मला त्यांत ! पण मुलगी केवढी आहे—कुणाची आहे तें तर सांगाल !

**बाबा०ः**—आहे, चौदा वर्षांवरची आहे—अन् कुणाची आहे त्याच्याशीं तुला कांहीं कर्तव्य नाहीं !

**विनायकः**—कर्तव्य नाहीं !

**बाबा०ः**—नाहीं ! मी सांगेन त्या मुलीशीं सांगेन त्या तऱ्हेनं लग्न केलं पाहिजे तुला समजलास ! ती लंगडी असेल, चकणी असेल, तिचा एक डोळा फुटला असेल, दांत पुढं आले असतील, ओंठ फाटलेला असेल, नाक नकटं असेल !

**विनायकः**—बाबा एक वैगुण्य आहे याच्यांत ! असल्या या अप्सरेला दाढी मिशा पाहिजेत थोड्या तरी !

**बाबा०:**—तोंडाला तोंड देऊं नकोस माझ्या ! माझ्यापेक्षां तुला जास्त कळतं कायरे ? मुलगी केवढी आहे म्हणून मला विचारतोस ! लाज नाहीं वाटत तुला ? माझ्या सांगण्याप्रमाणं जर दर रविवारीं सूर्योपासना केली असतीस, ब्रह्मकर्म नेमानं केलं असतंस—तर असा दासीपुत्रासारखा वागला नसतास ! संध्या जर नेमानं केली असतीस, तर बापाचा हुकूम तोडला नसतास ! तुला शास्त्र समजतं कायरे ? तुला वाटत असेल कीं साहेब लोकांची सर्व शास्त्रं तुलाच येतात म्हणून ! पण मी सुद्धां अल्जिब्रा वाचला आहे समजलास ! कारंट्या, हिशेबाहिशेबावरून मी ठरवलं आहे, कीं कारट्या चौदा वर्षांच्यावर लग्नावाचून ठेवल्या, तर कुलक्षय झालाच पाहिजे !—मला तुझे ते लॉगारिथम्स सुद्धां येतात !

**विनायकः**—बाबा हा तुमचा नवीनच शोध आहे ! लॉगारिथम्सवरून लग्नाचं योग्य वय ठरवतां येतं हें मला मुळींच माहीत नव्हतं !

**बाबा०:**—अरे आणखी पुष्कळच शोध आहेत माझे ! तुझ्या साहेब लोकांनीं लावलेले सर्व शोध खोटे पाडीन समजलास ! पाऊस पडतो—तो पाण्याची वाफ होऊन, ती कित्येक दिवस हवेंत राहून, मग पाण्याच्या रूपानं खालीं पडते—म्हणून कायरे ?

**विनायकः**—( थक्क होऊन ) म्हणजे बाबा !

**बाबा०:**—अरे त्या बाडग्यांना ईश्वराच्या घरचे नियम काय कळणार !

**विनायकः**—पाऊस पाण्याची वाफ झाल्याशिवाय पडतो असं तुमचं म्हणणं ?

**बाबा०:**—अरे तूं सुद्धां त्यांचाच जातभाई ! तुझ्या कसं टाळक्यांत उतरणार तें ? पाऊस नुसत्या वाऱ्यामुळं पडतो समजलास ! त्याला पाण्याची वाफ होण्याची, ती हवेंत राहण्याची, मग थण्ड होऊन पावसाच्या रूपानं पडण्याची जरूर काय ?

**विनायकः**—पण बाबा निव्वळ वाऱ्यामुळं पाऊस कसा पडेल ?

**बाबा०:**—अरे कवडीकिंमत ! तूं कधीं वारा वाहतांना कारंजाजवळ उभा राहिला होतास का ?

**विनायकः**—होय ! पुष्कळ वेळां !

**बाबा०:**—मग वाऱ्याच्या झोतानं अंगावर कधीं पाण्याचे तुषार नाहीं उडले तुझ्या ?

**विनायकः**—हो उडले !

**बाबा०:**—झालं तर तोच पाऊस ! त्याला वाफ पाहिजे कशाला ?

**विनायकः**—पण बाबा समुद्राचं पाणी वाऱ्याच्या योगानं वर गेलं आणखी जसंच्या तसं खालीं पडलं तर सगळा पाऊस खारट नाहीं का लागणार ?

**बाबा०:**—अरे शंखोबा ! पाऊस समुद्राच्याच पाण्याचा कशाला पडायला पाहिजे ? नद्यांना पाणी नाहीं वाटतं ?

**विनायकः**—बाबा तुमचे एकेक शोध ऐकून मी तर थक्कच झालों !

**बाबा०:**—अरे हे ब्राह्मणाचे शोध ईश्वराला सुद्धां थक्क करतील—मग तूं तर काय बच्चा आहेस अजून !

**विनायकः**—तुमचे हे शोध ऐकून माझी खात्री झाली कीं लग्नाच्या बाबतींत तुमची आज्ञा पूर्णपणें पाळायला मुळींच हरकत नाहीं !—ठीक आहे तुम्हीं मघांशीं वर्णन केलेली मिशावाली मुलगी शोधून काढा, म्हणजे मी आनंदानं एका पायावर तिच्याबरोबर लग्न लावायला कबूल आहे ( जाऊं लागतो )

**बाबा०:**—विन्या फार फाजीलपणा करूं नको—तुझं लग्न उषाशीं करायचं ठरवलं आहे समजलास ! जा बोलाव तिला आतां, अन् सांग तिला—शिवा ऽ ए शिवा ऽऽ

[ लांबून शिवाचा जी ऽ ऽ म्हणून आवाज येतो ]

**विनायकः**—उषाशीं बाबा ? उषाशीं !

**बाबा०:**—हो उषाशीं !

[ शिवा येतो ]

**विनायकः**—पण ती तेरवां आली तेव्हां तुम्ही नक्की बजावलंत ना ? कीं मी जर तिच्याशीं लग्न केलं तर दोघांनाही घरांतून हांकून देईन म्हणून !

**बाबा०:**—हो ! अन् आतां सांगतो कीं जर केलं नाहींस, तर हांकून देईन तुला घरांतून !

**विनायकः**—बाबा, मी उषाशीं साफ लग्न करणार नाहीं!—कारण ती चौदा वर्षांपेक्षां फार मोठी आहे—अन् तिचा एक सुद्धां डोळा फुटलेला नाहीं—अन् तिला मिशाही नाहींत!

**बाबा०ः**—विन्या! फाजीलपणा पुरे कर—शिवा खालीं जा, अन् उषाला सांग, तुला विनायक वर बोलावतो आहे म्हणून!

**शिवाः**—जी. ( जाऊं लागतो )

[ बाबासाहेब विनायकाकडे एक नजर फेंकून निघून जातात. शिवा उलटून परत येतो ]

**शिवाः**—धनी!

**विनायकः**—काय?

**शिवाः**—धनी, माझा होरा चुकला!

**विनायकः**—होरा चुकला—कसला होरा चुकला!

**शिवाः**—धनी मी म्हातारा झालो—माझी नजर ग्येली—डोळ्याच्या अक्षी खाचा झाल्या?

**विनायकः**—डोळ्याच्या खाचा झाल्या?

**शिवाः**—व्हय धनी! मी म्हंगालो उषाताई या घरची धनीन व्हनार!—पन होरा चुकला—नजर चकली धनी! खरी धनीन दुसरीच निघूं पगतीया!

**विनायकः**—( एकदम् त्याच्याकडे पाहून ) दुसरीच? ती कोणती?

**शिवाः**—ती दुसरी बया! उर्मिळाताई!! अक्षि तुमच्यावर लई सता गाजवतोया! तुमी भाईर ग्येला, म्हंजी तुमच्या खोलींत घुसुनशान् समदि कपाट तपासती, वह्या वाचूनशान् पगती—मी खाकरलो—खोकारलो तरी दाद न्हाई!—बयाच्या हुरद्याला भिती म्हाईतच न्हाई अक्षि!

**विनायकः**—गाढव आहेस तूं—चल जा खालीं!

**शिवाः**—गाडव तर खरा—पन् डोक्यांत अकूल लय मोटी—अन् डोल लय चलाक!—पन धनी, आतां मी लयू दिसाचा सोबती न्हाई!

**विनायकः**—काय बोलतोस काय शिवा तूं!

**शिवा:**—मला मोटी घमेंड धनी—कीं कोनाची कोनावर पिरीत हाय त्ये मला लई लवकर उमगतया म्हून—पन तुमी चकावलं !

**विनायक:**—( चौकसपणानें ) मी चकवलं ? तें कसं काय ?

**शिवा:**—धनी, येकदां वाटतया, ही बया तुमची रानी व्हनार—येकदां वाटतं ती व्हनार ! पन सकलपासून तर वाटाया लागलं... ( मान हलवीत उभा राहतो )

**विनायक:**—काय वाटायला लागलं ?

**शिवा:**—लय वंगाळ ! लय वंगाळ ! !

**विनायक:**—( संतापून ) काय वंगाळ ?

**शिवा:**—धनी, मी पन पिरीत क्येली, तुमच्यासारकी दोगीवर क्येली ! अन् श्येवटीं दोगीबराबर लगान लावलं—अन् फसलों !—( विनवणी करीत ) धनी, तुमी काईबी करा—पन् दोगीबराबर लगान करुं नका ! माजं म्हाताऱ्याचं ऐका !

**विनायक:**—शिवा, कांहीं अक्कल आहे का तुझ्या डोक्यांत ?—चल जा खालीं !

**शिवा:**—डोळ्याला दिसतंया ते बोलूनशान् टाकतो धनी ( माना हलवीत निघून जातो )

[ विनायक अस्वस्थपणें खोलींत इकडे तिकडे येरझारा घालतो, इतक्यांत उषा प्रवेश करते ]

**उषा:**—काय ?

**विनायक:**—कुठं काय ?

**उषा:**—कुठं काय ? मला बोलावलंतना तुम्ही !

**विनायक:**—मी बोलावलं ? कुणी सांगितलं तुला ?

**उषा:**—शिवानं !

**विनायक:**—शिवाचं किंचित् डोकं फिरल्यासारखं झालं आहे !

**उषा:**—तें असो—हें वाटाणेचं काय प्रकरण आहे ?—त्यांत तुम्ही भाग घेतला होता ?

**विनायकः**—हो—त्याचं काय ?

**उषाः**—त्याचं काय ? त्या प्रकरणामुळं माझ्या नांवाची किती बदनामी झाली कॉलेजमध्यें, ठाऊक आहे का तुम्हाला ?

**विनायकः**—कॉलेजमधल्या प्रत्येक मुलीच्या नांवाची, ती केवळ कॉलेजमध्यें जाते, म्हणूनच बदनामी सुरू होते ! त्यांत नवं असं काय आहे ?

**उषाः**—नवं असं आहे, कीं मला रेसीडेन्सी सोडून जाण्यासंबंधीं नोटीस मिळणार आहे !

**विनायकः**—ती काय म्हणून ?

**उषाः**—विद्यार्थ्यांशीं फार दोस्ती ठेवते म्हणून—त्यांच्या टोळ्या कॉलेजच्या पार्कमध्यें बोलावते म्हणून, कांहीं गरीब आणखी सालस विद्यार्थ्यांना बोहऱ्याचा वेष घ्यायला लावून त्यांच्या मागें पोलीस लावते म्हणून ! नुसती रेसीडेन्सीच सोडायला लावणार आहेत, ही मेहेरबानीच समजायची !

**विनायकः**—काय नुकसान होणार आहे तूं रेसीडेन्सी सोडलीस तर—अन् कॉलेजमध्यें शिकून तरी काय फायदा आहे तुला ? हव्या तेवढ्या ग्रॅज्यूएट मुली सुद्धां बेकार राहायला लागल्या आहेत आतां !

**उषाः**—म्हणजे पैशाकरतां का मी शिकते आहे ?

**विनायकः**—नाहीं तर कशाकरतां ? पैशाकरतां नसलं तर लग्नाकरतां—त्याचाच अर्थ तो !

**उषाः**—म्हणजे नोकरी अन् लग्न एकच वाटतं ?

**विनायकः**—मग दुसरं काय—अग नोकरी म्हणजे पुरुषांचा धंदा आणि लग्न म्हणजे बायकांचा धंदा !

**उषाः**—धंदा !

**विनायकः**—अगदीं पोटापाण्याचा—कपड्यालत्त्यांचा—डागडागिन्यांचा समजलीस ! अन् धंदा म्हणजे असा तसा नाहीं लेचापेचा—नौकरी एक महिन्याची नोटीस देऊन निदान सोडतां तरी येते ! पण हा लग्नाचा धंदा मालक जिवंत असेपर्यंत अगदीं कायम, अन् या आर्यावर्तांत तर त्याचं प्रेत जळल्यावर सुद्धां लग्नाची ईश्वरी नेमणूक संपत नाहीं !

**उषाः**—( त्याच्याजवळ जाऊन ) किती फरक पडत चालला आहे तुमच्यामध्यें हा !

**विनायकः**—( एक पाऊल मागें घेऊन ) म्हणजे वेड बिड लागलं आहे असं समजतेस कीं काय मला तूं !

**उषाः**—वेड नाहीं तर काय ? तुम्हाला काय वाटतं, असं लग्नाच्या विरुद्ध बोलल्यानं आम्ही स्त्रिया कधीं लग्नाची कल्पना सोडून देऊं म्हणून !

**विनायकः**—कशी सोडाल ? तो तुमच्या पोटापाण्याचा प्रश्न आहे—तुमच्या सर्व अस्तित्वाचं सार आहे !

**उषाः**—( त्याच्या अगदीं जवळ जाऊन त्याच्या कोटाच्या गुंडीशीं खेळत ) इतकं जर कळतं आहे तर कशाला त्या विषयावर इतका जिवाला त्रास करून घेतां—लग्न झाल्यावर नुकसान माझंच होणार आहे ना ! तुमचं नाहींना ! अन् शिवाय तुम्ही मला वाईट का वागवाल कधीं तरी ?

**विनायकः**—सर्व सत्ता माझ्या हातीं असल्यावर कां नाहीं वाईट वागवणार ? तुला वाटलं तर मारीन, झोडीन, रात्रभर माझी वाट पहात तिष्ठत ठेवीन, तुला सांगून सवरून दुसऱ्या बायकांच्यावर प्रेम करीन, दारु पिईन—मला कोण अडवणार आहे ?

**उषाः**—कां बरं ? मी अडवीन !

**विनायकः**—तूं अडवशील पण कायदेशीर मार्गानं नव्हे ! धार्मिक मार्गानं नव्हे !—फक्त विनवण्या करून—पायां पडून ! अन् शेवटीं तुझ्या विनवण्यांचा मला त्रास वाटला अन् तुला मी लाथेच्या ठोकरीनं उडवली—म्हणजे तूं काय करायचं ठाऊक आहे का तुला !

**उषाः**—( त्याच्याकडे अभिमानाच्या लाडीकपणानें पहात ) काय ?

**विनायकः**—" असे पति देवचि ललनांना " हें पद म्हणायचं ! अन् पुन्हा पाय घट्ट धरायचे आणखी शेवटीं संतापून मी हातांत काठी घेऊन तुझं डोकं फोडलं, तुझी पोरं मारली म्हणजे...

**उषाः**—तर ! तर ! लोकं बरीं स्वस्थ बसतील !

**विनायकः**—( संतापून ) स्वस्थ बसतील असं कोण म्हणतो गाढव !

चांगल्या टाळ्या पिटतील—वन्स् मोअर देतील ! तूं मेल्यावर तुझं प्रेत डोक्यावर नाचवून 'आर्य स्त्री, आर्य स्त्री' म्हणून तुझा गौरव करतील ! आणि तुझ्या पतिदेवाला ताबडतोब नवी नवरी अर्पण करतील !

**उषाः**—तुमची ही मतं ऐकली म्हणजे किती किती अभिमान वाटतो तुमच्यासंबंधीं—अन् म्हणूनच नानांशीं भांडून मी तें लग्न मोडलं याबद्दल मला मुळीच पश्चात्ताप होत नाहीं !

**विनायकः**—उषा तुला अगदीं खरं सांगायचं म्हणजे तूं मला फारच आवडतेस ! पण दुर्दैवानं माझं तुझ्या एकटीवर प्रेम नाहीं !

**उषाः**—( दोन पावलें मागें घेऊन ) एकटीवर प्रेम नाहीं ! मग इतके दिवस नुसती फसवणूक केलीत वाटतं माझी !

**विनायकः**—तुझी कसली—मी स्वतःची फसवणूक करून घेतली !

**उषाः**—स्वत:ची ?

**विनायकः**—होय स्वतःची !

**उषाः**—ती कशी काय ?

**विनायकः**—माझं प्रेम तुझ्या एकटीवर नसतांही मी तें आहे असं गृहीत धरून चाललों !

**उषाः**—( संतापून ) तुम्ही स्वतःला हवं तेवढं फसवायचं होतंत—पण त्यामुळं माझी फसगत होईल याचं तुम्हाला कसं भान राहलं नाहीं !

**विनायकः**—मनुष्य पाण्यांत बुडत असला तर समोर दिसेल त्याला मिठी मारतो—अगदीं तशी माझी स्थिती झाली होती ! उर्मिळेच्या प्रेमानं मी वेडा झालों होतों !

**उषाः**—उर्मिळेच्या प्रेमानं !

**विनायकः**—होय ! आणखीन् तिनं माझी याचना झिडकारल्यावर मी इतका हवालदील झालों, इतका वेडावलों, कीं मी जगलों कसा याचं माझं मलाच आश्चर्य वाटतं—अशा वेळेला तूं मला भेटलीस अन् बुडत्याला काडीचासुद्धां आधार मग तूं तर काय ?—केवळ तुझा आधारानं जगलों—

उषा तुझ्याविषयीं माझ्या मनांत किती कृतज्ञेच्या भावना खेळताहेत हें जर दाखवून देतां आलं असतं...

**उषाः**—( संताप आवरून ) मी कांहीं जाणून बुजून तुमच्या उपयोगीं पडले नव्हते—तेव्हां या तुमच्या कृतज्ञतेच्या भावना तुम्हीं आपल्याजवळच ठेवा—हृदय फाडून त्या चवाठ्यावर मांडण्याचं कांहींच कारण नाहीं !

**विनायकः**—उषा तूं माझं थोडं ऐकून घेशील का ?

**उषाः**—तुम्ही पुढं काय म्हणणार असाल हें मी पूर्ण ओळखून आहे—मला भगिनीप्रेमानं वागवीन म्हणून सांगणार असाल—आत्तां या घटकेपासून ताई, अक्का, माई या नांवानं हांक मारायला लागणार असाल, पण मी तुम्हाला बजावून ठेवते कीं तुमच्यापासून भ्रातृप्रेम मिळवण्याकरतां कांहीं मीं तुमची ओळख करून घेतली नव्हती समजलांत—माझ्या घरीं मला खूप भाऊ आहेत !

**विनायकः**—पण मी काय म्हणतो तें निदान दयेखातर तर ऐकून घेशील ?

**उषाः**—एक क्षणभरही तुमच्याशीं बोलण्याची माझी इच्छा नाहीं ! मी आत्तां हें घर सोडून चालती होणार—आपण जरा खालीं जाऊन उर्मिळेला वर पाठवाल तर उपकार होतील माझ्यावर !

**विनायकः**— उर्मिळेला !—ती कशाला ?

**उषाः**—तिला वर पाठवा—अन् मग माझं आणखी तिचं काय काय बोलणं होईल तें तें ती तुम्हाला सांगेलच. उद्यांपासून—डोंगरावरून हिंडतांना, बगीचांतून फिरतांना, कांहींतरी गुलगुल गोष्टी सांगायला पाहिजेतच ना प्रणयी जोडप्याला !

**विनायकः**—उषा एका क्षणांत झालेली तुझी ही अवनति पाहून मला असं वाटायला लागलं आहे कीं...

**उषाः**—आपण नका माझी उन्नति करायचा प्रयत्न करूं ! ( संतापून ) पाठवणार आहांत का तुम्ही उर्मिळेला वर ?

**विनायकः**—नाहीं ! तुझ्या या असल्या मनःस्थितींत तुझी आणखीन् तिची भेट होणं मला इष्ट वाटत नाहीं !

**उषाः**—इतक्यांतच नका तिला मऊ मखमलींत ठेवण्याचा प्रयत्न करूं— तुम्ही नसाल पाठवणार तर मीच हांक मारते कशी ! उर्मिळा—ए उर्मिळा !

[ उर्मिळेचा खालून ' आल्ये, आल्यें ' असा आवाज येतो ]

**उषाः**—आपण जरा खालीं जाल का !

**विनायकः**—तुझ्या या आततायीपणानं वागण्याचा तुला पश्चात्ताप होईल बरं का !

**उषाः**—पश्चात्ताप झाला म्हणजे मग रडीन, आणखीन् तुमची अन् तुमच्या राणीची क्षमा मागीन समजलांत !

**विनायकः**—ठीक आहे ! तुला काय हवं तें कर ! (निघून जातो)

[ उषा संतापानें खोलीभर हिंडते, उर्मिळा प्रवेश करते ]

**उर्मिळाः**—काय ग उषा—काय झालय काय तुला ! केवढ्यांदा ओरडतेस ही ! आपण लोकांच्या घरीं आहों याचं कांहीं भान आहे का तुला ?

**उषाः**—आपण चुकताहांत बाईसाहेब ! हें घर आतां लोकांचं नाहीं राह्यलं—आतां हें आपलं आहे—अन् आम्ही तुमच्या घरच्या पाहुण्या आहोंत—समजलांत !

**उर्मिळाः**—( जवळ जाऊन ) काय बोलते आहेस तरी काय तूं उषा !

**उषाः**—कृपा करून वेड पांघरूं नका असं ! अजून कांहीं मनुष्यपणा शिल्लक असेल अंगांत, तर निदान एवढं तरी लक्ष्यांत ठेवा कीं लोकांनाही मनं असतात, सुखदुःखं असतात !

**उर्मिळाः**—काय केलं आहे तरी काय मी असं !

**उषाः**—( तिच्यासमोर उभी राहून आव्हानपूर्ण स्वरांत ) मला काय कुकुबाळ समजतेस का ग तूं ! काय केलं आहेस सांगू तुला ? जगांत मैत्री म्हणजे लुच्चा लोकांची बाष्कळ बडबड आहे, तुझ्यासारख्या मानभावी लोकांनीं स्वार्थ साधण्याकरतां केलेला कावा आहे—हें सिद्ध करून दाखवलं आहेस समजलीस !—अन् तूं हें सारं करून सवरून वर धिट्टाईनं मला 'काय केलं' म्हणून विचारतेस !—खरोखर तुझी एकेक पत्रं आणखीन् एकेक आश्वासनं आठवलीं म्हणजे असं वाटतं कीं एक सुरी घेऊन तुझ्यावर विश्वास ठेवणाऱ्या

या माझ्या हृदयाच्या नुसत्या चिंध्या चिंध्या करून टाकाव्या! (एका खुर्चीवर बसून हाताच्या ओंझळींत तोंड लपवते)

**उर्मिळाः**—(तिच्याजवळ जाऊन) वेडे, झाल्या या साऱ्या गोष्टी मी जाणून बुजून केल्या असं का वाटतं तुला?

**उषाः**—(तिचा हात झिडकारून) कृपा करून दया नका करूं माझ्यावर! झाले हे उपकार काय थोडे झाले!

**उर्मिळाः**—(प्रेमळ स्वरांत) उषा विनायकराव तुझ्याशीं काय बोलले—तुला इतकं संतापायला काय झालं आहे, याची मला नीटशी कल्पना सुद्धां नाहीं अजून! अशा परिस्थितींत मी तुझं सांत्वन कसं बरं करणार?

**उषाः**—तूं माझं सांत्वन करणार!—तूं?

**उर्मिळाः**—तुला काय वाटतं, मी जाणूनबुजून तुझ्याबरोबर या घरीं येऊन विनायकरावांचं तुझ्यावरचं प्रेम हिरावून नेलं?

**उषाः**—कल्पना नव्हती ना नीटशी तुला! मग आतां कसं ओळखलंस नेमकं कीं ...

**उर्मिळाः**—उषा, तुझं आजचं हें वर्तन पाहून मला असं वाटायला लागलं आहे कीं आपण आणखी जंगलांत वस्ती करून राहणाऱ्या रानटी स्त्रिया यांत कांहींएक फरक राहिला नाहीं!

**उषाः**—आतां तुमचा वेदांत मारा आमच्या माथीं!

**उर्मिळाः**—ठीक आहे! एखाद्या हाडकावर दोन कुत्रीं भांडतात त्याप्रमाणं मी तुझ्याशीं या प्रश्नावर भांडायला तयार नाहीं! (दरवाजाकडे जात) मी माझी बांधाबांधी करून अत्तां अकराच्या गाडीनं निघून जाणार! (जाऊं लागते)

**उषाः**—(तिला आडवी होऊन संतापानें) मला तुझ्यापासून एकच खुलासा हवा आहे!

**उर्मिळाः**—माणुसकी ठेऊन विचारणार असलीस तर वाटेल तो खुलासा विचार! मी द्यायला तयार आहे!

**उषाः**—इकडे येण्याच्या अगोदर मी तुला एक प्रश्न विचारला होता!

**उर्मिळाः**—कोणता?

**उषाः**—तुझ्या आणखी विनायकरावांच्या मैत्रीसंबंधींचा! मी तुला विचारलं एवढी तुमची जगद्विख्यात मैत्री तुटली कशी! त्यावर तूं म्हणालीस "त्यांचं माझ्यावर कधींच प्रेम नव्हतं अन् म्हणून त्यांनीं माझी प्रेमयाचना झिडकारली!"

**उर्मिळाः**—बरं मग!

**उषाः**—पण वास्तविक गोष्ट अशी होती कीं विनायकरावांचं तुझ्यावर इतकं भयंकर प्रेम होतं कीं तूं त्यांची मागणी नाकारलीस, त्यामुळं ते जवळ जवळ वेडे झाले होते! अन् हें सारं तुला ठाऊक होतं!

**उर्मिळाः**—सारं नव्हतं! पण थोडंबहुत ठाऊक होतं!

**उषाः**—त्या वेळीं तूं माझ्या प्रश्नाला जर खरं उत्तर दिलं असतंस तर माझ्यावरचा इथं येऊन आपली फजिती करून घेण्याचा प्रसंग सहज टळला असता!

**उर्मिळाः**—( तिचा हात धरते व तिला नेऊन एका खुर्चीवर बसवते ) उषा, रागाच्या भरांत तुझ्या मनाचा किती गोंधळ उडाला आहे याची तुला कल्पना तरी आहे का? वेडे विनायकरावांची आणखी माझी गेल्या तीन वर्षांत एकदाही भेट झाली नव्हती, ही गोष्ट तूं विसरतेस अन् माझ्यावर त्यांच्याशीं कट केल्याचे भलभलते आरोप करतेस!

**उषाः**—मग विनायकरावांचं तुझ्यावर इतकं अपरिमित प्रेम होतं ही गोष्ट तूं माझ्यापासून कां लपवून ठेवलीस?

**उर्मिळाः**—अगदीं खरं सांगायचं म्हणजे माझ्या मनांतलं हें गुपित तुला सांगायला मी कोणत्याही कारणानं बांधली गेल्यें नव्हते म्हणून!

**उषाः**—( संथपणानें उठून ) ठीक आहे! समजलं मला सारं काय आहे तें—आतां तूं कशाला निघून जातेस आपलं हे हक्काचं घर सोडून—मीच जाते म्हणजे झालं!

**उर्मिळाः**—उषा तुला जायचं असलं तर अगदीं आनंदानं जा. मी कांहीं तुला अडवीत नाहीं—पण जायच्या अगोदर मी तुला एक गोष्ट सांगते ती संथ ऐकून घे—अन् मग जा. बैस इथं अशी!

[ उषा बसते ]

**उर्मिळाः**—तीन वर्षं झाली; विनायकराव अन् मी इंटरसायन्सच्या क्लासमध्यें होतो! विनायकराव माझ्यावर अतिशय प्रेम करूं लागले, आणखी मला तर त्यांच्याशिवाय कुठंही एक क्षणभर सुद्धां चैन पडत नसे—आम्ही क्लास बुडवत असूं! वाटेल तेव्हां बागेंत फिरत असूं, संधी सांपडेल तेव्हां चांदण्यांत भटकत असूं—कारण आम्हाला अडवणारं असं कोणीच नव्हतं! तूं तेव्हां किती तरी लहान होतीस—हायस्कूलांत होतीस! तुला सुद्धां आमच्या दाट मैत्रीची पुसट पुसट आठवण असेलच!

**उषाः**—मला चांगलीच आठवण आहे!

**उर्मिळाः**—पण विनायकरावांच्या स्वभावांतली एक गोम मला आवडत नसे! ते अतिशय खोडकर असत! प्रोफेसरपासून विद्यार्थ्यांपर्यंत अन् हेड क्लार्क-पासून शिपायापर्यंत वाटेल त्याची थट्टा करीत असत—कित्येक वेळां प्रिन्सिपॉल-जवळ जाऊन त्यांना क्षमा मागण्याचे प्रसंगही आले,—त्यामुळं मी त्यांच्यावर एकदां खूप रागावले अन् नेमकी त्या वेळीं त्यांनीं मला एक दिवस मागणी घातली!

**उषाः**—बरं मग!

**उर्मिळाः**—त्या वेळीं मी अंगीं खोटा संताप आणून त्यांना खूप टाकून बोलल्यें—जवळ जवळ खरडपट्टीच काढली असं कां म्हणेनास! (स्तब्ध राहते)

**उषाः**—अत्तां आलं माझ्या लक्ष्यांत—विनायकराव नेहमी—बरं पण पुढं काय झालं?

**उर्मिळाः**—पुढं काय व्हायचं तेंच झालं—त्यांना अतिशय अपमान वाटून ते दोनतीन दिवस माझ्याशीं बोलले नाहींत—आणखी मनांत असतानाही मी त्यांची समजूत पाडली नाहीं!

**उषाः**—कारण?

**उर्मिळाः**—कारण असं कीं निदान त्या वेळीं तरी मला त्यांच्यापेक्षां जास्त कळत असे! आमचं अजून शिक्षण पुरं झालं नव्हतं, आणखीन् आमच्या एकमेकांवरील प्रेमासंबंधीं माझी पूर्ण खात्री होती—तेव्हां मी करूं नये ती चूक करुन बसल्यें!

**उषाः**—ती कोणती?

**उर्मिळा:**—विनायकराव दोन तीन दिवसांनीं पुन: माझ्याकडे आले आणखीन् त्यांनीं फिरून प्रेमयाचना केली—आणखीन् काय मला मूर्खपणा सुचला न कळे मी त्यांना विचारलं, एवढं प्रेम, प्रेम करतां—वय काय आहे तुमचं ?

**उषा:**—( विचारांत निमग्न होऊन शून्यांत नजर रोखून स्तब्ध बसते, नंतर थोड्या वेळानं सावध होऊन ) मग पुढं काय झालं !

**उर्मिळा:**—पुढचं सारं तुला ठाऊक आहे—विनायकरावांनीं संतापानं कॉलेज बदललं—अन् त्याच सुमारास तूं मॅट्रिक झालीस आणखी तुझी त्यांची दाट मैत्री झाली, तेव्हां...( थांबते )

**उषा:**—तेव्हां काय ?

**उर्मिळा:**—तेव्हां मी त्यांची समजूत पाडण्याची कल्पना मनांतल्या मनांत दाबून स्वस्थ बसले—आणखी त्यांचा नाद सोडून दिला, ती स्थिती आजपर्यंत कायम आहे—तेव्हां तुझ्या अंगांत सामर्थ्य असलं, आणखी तुझं त्यांच्यावर खरं प्रेम असलं तर तूं त्यांच्यापासून दुरं नकोस—मी पुन्हां कधींही तुझ्या मार्गांत आडवी येणार नाहीं याची खात्री बाळग.

( हळूहळू उठून दरवाजाकडे जाऊं लागते )

**उषा:**—( तिला घाईघाईनें अडवून ) उर्मिळाताई, तूं एकटी कुठं जातेस—मी सुद्धां तुझ्याबरोबर येते—मला आतां एक क्षणभरसुद्धां इथं राह्यचं नाहीं—नानांना तोंड दाखवायचं नाहीं—कॉलेजमध्यें जायचं नाहीं—कांहीं-कांहीं-कांहीं करायचं नाहीं !

**उर्मिळा:**—( नरमून तिला जवळ घेऊन ) तुला माझ्याबरोबर यायचं आहे ? माझ्या घरीं ? ( उषा मानेनं 'हो' म्हणते, उर्मिळा कांहीं वेळ विचार करून ) आवडते मला तुझी कल्पना ही ! आपण दोघी या सुटींत खूप खूप वाचूं ! मी तुला इतक्या पुष्कळ गोष्टी सांगीन कीं विचारतां सोय नको ( किंचित् मृदु आवाजांत ) अन् मी प्रेमावर कसा विजय मिळवला तेंही सांगेन !

**उषा:**—त्या विषयावर एक शब्द सुद्धां बोलणार नसलीस तरच येईन मी !

**उर्मिळा:**—वेडी रे वेडी ! बरं नाहीं बोलणार ! झालं आतां ! मग जायचं ना आपण आज !



अंक ४ था ] **विनायकः—**तुम्हां दोघींनीं जायची तयारी चालवली आहे इथून ? [ पान १०५

**उषाः**—हो.

**उर्मिळाः**—मग उशीर नको; शिवा ऽ ऽ ए शिवा ऽ

**शिवाः**—( लांबून ) जी ऽ ऽ ( येतो )

**उर्मिळाः**—शिवा, आमची जायची तयारी कर. कपडे वाळले नसले तर एकेरी घाल ताबडतोब !

**शिवाः**—( त्यांच्याकडे निरखून पहात ) कोना कोनाची तयारी करूं जायची ? तुमची अन् धाकल्या धन्यांची—कीं येंची अन् धाकल्या धन्यांची ?—का तिगांची बी !

**उर्मिळाः**—( किंचित् रागावून ) माझी—अन् उषाताईची !

**शिवाः**—( समाधानाचा सुस्कारा टाकून ) जी. ( जातो )

**उषाः**—( दुःखी मुद्रेनं ) उर्मिळाताई, आपण सुशिक्षित सुशिक्षित म्हणून मिरवणारीं माणसं किती रानटी राहिलों आहों ग अजून ? नेणतेपणानं का होईना, मी तुला अन् विनायकरावांना किती टाकून बोलल्यें !

**उर्मिळाः**—बोललीस तें वाईट नाहीं झालं ! मला कांहीं इतकी साधू समजूं नकोस तूं अगदीं ! पण जाऊं दे तें सारं—पुढं मागं बोलूं आपण त्यावर. आपलं ठरलं आहे ना एकदां कीं सध्यां त्या विषयावर कांहींच बोलायचं नाहीं म्हणून !

[ विनायक घाईघाईनें प्रवेश करतो ]

**विनायकः**—हें काय ऐकतों आहे मी ! तुम्ही जायची तयारी चालवली आहे इथून !

**उर्मिळाः**—हो.

**विनायकः**—पण मला न भेटतां ! न सांगतां !

**उर्मिळाः**—( किंचित् हंसत प्रेमळ स्वरांत ) तुम्हाला सांगितल्याशिवाय कशा बरं जाऊं आम्ही ?

**विनायकः**—( कांहीं वेळ थांबून संथपणानं ) उषा,—उर्मिळा—तुमच्या एक गोष्ट लक्षांत आली आहे ?

**उषाः**—कोणती ?

**विनायकः**—जगांतले अनंत दुःखमय प्रसंग जर आपण उकलून पाहिले,—त्यांच्या मुळाशीं जाऊन त्यांच्या आदिकारणांचा छडा लावायचा प्रयत्न केला, तर काय दिसेल असं वाटतं तुम्हाला ?

**उर्मिळाः**—( थट्टेनं ) आपल्याला नाहीं बोवा समजत तुमचा हा वेदांत !

**विनायकः**—तुम्हाला हेंच दिसून येईल कीं या साऱ्या शोकमय प्रसंगांचं मूळ मनुष्याच्या उतावळ्या, संशयी, भावनाप्रधान अशा वृत्तींत असून मनुष्यानं जर प्रयत्न केला तर तो आपल्यावर आलेल्या निदान अर्ध्या अधीक आपत्ती तरी टाळूं शकेल.

**उषाः**—तुम्हाला खरं सांगायचं म्हणजे मी या घटकेला कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नावर विचार करण्याच्या मनःस्थितींतच नाहीं मुळीं !

**विनायकः**—आणखी असं असून सुद्धां उतावळेपणानं तूं हें घर सोडून निघून जातेस ! वास्तविक पाहूं गेलं असतां आपण तिघेही आज कोणत्याच प्रश्नावर नक्की विचार ठरविण्याच्या मनःस्थितींत नाहीं !

**उषाः**—तिघेही ?

**विनायकः**—होय तिघेही ! आणि म्हणूनच माझं जर ऐकणार असाल, तर तुम्ही दोघींनींही आज—उद्यां—परवां—आठ दिवस—पंधरा दिवस हें घर सोडून जाऊं नये !

**उषाः**—कारण ?

**विनायकः**—कारण असं कीं मी तुझ्याशीं केवळ सभ्यपणानं वागलों म्हणून तूं रागावलीस, आणखी या घरच्या सर्व माणसांना दुःखांत लोटून, अश्रूंची शिधोरी बरोबर घेऊन, आपल्या स्वतःच्या आनंदी घरांत स्मशानांतली विषण्णता निर्माण करण्याकरतां जायला निघालीस म्हणून !

**उर्मिळाः**—पण इथं राहून सुद्धां हें सारं टळणार कसं ?

**विनायकः**—केवळ आपल्या तिघांच्या शहाणपणानं !—जिव्हाळ्याच्या मैत्रीनं !

**उषाः**—( थक्क होऊन ) जिव्हाळ्याच्या मैत्रीनं ! म्हणजे तुम्ही काय आम्हां दोघींशीहि लग्न करण्याचा बेत चालवला आहे कीं काय ?

[ उर्मिळा व विनायक खूप हंसतात. हळूहळू उषाही त्यांच्याबरोबर हंसूं लागते ]

**विनायकः**—( हंसू आवरीत ) म्हणजे मी हळू हळू तुम्हां दोघींच्याही तडाक्यांतून सुटण्याचा प्रयत्न करतों आहे आणखी त्याच्या उलट...

**उर्मिळाः**—( हंसूं आवरून ) बरं तें असो ! आम्ही इथं राह्यलों, तर काय करायचा बेत आहे तुमचा ?

**विनायकः**—आपलीं लग्नं मोडलीं असं गृहीत धरायचं ! आपण तिघांनींही झालेल्या प्रकाराबद्दल बेलाशक चर्चा करायची—माझं तुम्हां दोघींवर प्रेम कां बसलं—कसं बसलं—त्या प्रेमाचं स्वरूप कोणत्या तऱ्हेचं होतं—आपलं तिघांचंही भवितव्य काय—यावर खूप खूप बोलून टाकायचं !—( एकदम गंभीर चेहरा धारण करून )—कारण हीं असलीं सत्यं मनांतल्या मनांत गाडून टाकल्यामुळंच जगांतले अर्धे अधीक दुःखमय प्रसंग निर्माण होतात अशी माझी खात्री आहे !

[ ताई व प्रभाकर घाईघाईनें प्रवेश करतात ]

**प्रभाकरः**—विनायक, हें रे काय हें, उषा अन् उर्मिळा जायल्या निघाल्या आहेत ?

**ताईः**—( संतापानं ) दादा, तुला मारे वाटत असेल, कीं आपण म्हणजे कोणी मोठे शहाणे आहोत म्हणून !—पण जगाला निराळंच वाटतं बरं का !

**विनायकः**—मला जगाशीं कांहींच कर्तव्य नाहीं ! माझं उषेवर अन् उर्मिळेवर दोघींवरही प्रेम होतं आणखीन्...

**प्रभाकरः**—<br>**ताईः**— } दोघींवर !

**विनायकः**—त्यांत अशक्य काय आहे ? माझं बाबांवर प्रेम आहे, तुझ्यावर आहे, प्रभाकरवर आहे, शिवावर आहे—तसं त्या दोघींवर आहे—त्यांत अशक्य काय आहे ?

**प्रभाकरः**—( थट्टेनं ) मग काय त्या दोघींशीं का तूं लग्न करणार आहेस ?

**ताईः**—( हंसत ) करील तो ! त्याचा कांहीं नेम राह्यला नाहीं !

**विनायकः**—आमचं तिघांचंही लग्न मोडलं असून त्या दोघी आतां परीक्षेच्या तयारीला लागणार आहेत समजलीस ! अन् मी या दोघींच्या तडाक्यांतून सुटलों या आनंदांत आतां फिजिक्स—केमिस्ट्री—बॉटनी या विषयांकडे लक्ष देणार आहे—सूर्य, चंद्र, तारे, नक्षत्र, ग्रहमाला यांचं निरीक्षण करणार आहे—साधल्यास माझा तो यांच्या प्रेमामुळं अर्धवट राहिलेला शोध...

**उर्मिळाः**—( हंसत ) ताई शोध कोणचा ठाऊक आहेना तुला...

**ताईः**—हो ! हो ! गुडगुडी ओढण्याचा !

**उषाः**—एक लग्न मोडलं म्हणून गुडगुडी शोधून काढली—आतां दोन लग्नं मोडलीं म्हणून दारू गाळण्याची भट्टी न काढोत म्हणजे मिळवली !

**प्रभाकरः**—बरं विनायक पण पुढं काय ?

**विनायकः**—पुढं काय ? लग्नाशिवाय नाहीं राहणार कांहीं आम्ही ! उषानं किंवा उर्मिळेनं वाटेल त्याच्याशीं लग्न करायचं. आणखीन् त्यांच्या पैकीं जी माझ्या करतां आणखीन् तीन वर्षं वाट पाह्यला तयार असेल, तिच्याशीं मी लग्न करणार !

**उषाः**—लग्नं मोडलीं हें कबूल; पण तुमचं पुढलं आम्हांला कांहींच कबूल नाहीं !

**विनायकः**—कारण ?

**उषाः**—तुम्ही कोण आमच्या आयुष्याचं पुढलं धोरण ठरवणार !

**विनायकः**—जिव्हाळ्याचा मित्र म्हणून !

**उर्मिळाः**—( थट्टेनें ) आपण नाहीं रे बोवा असल्या मित्राशीं लग्न करणार !

**विनायकः**—ठीक, मित्राशीं नाहीं—तर शत्रूशीं करा !—नाहीं—तरी लग्न झाल्याबरोबर नवरा बायको शत्रू होतातच !—

( सर्वजण हंसतात. बाबासाहेब प्रवेश करतात )

**बाबा:**—विनायक, काय ठरलं तुझं ?

**विनायक:**—मी खटपट करून पाहिली बाबा, पण माझ्याशीं उषा लग्न करायला तयार नाहीं ! म्हणून तुमचा मार्गशीर्षांतला बेत खरा करण्याकरतां उर्मिळेलाही विचारून पाहिलं—पण ती सुद्धां नाहीं म्हणते !

**बाबा०:**—( थक्क होऊन ) उर्मिळाताईना विचारून पाहिलं ! विन्या, थट्टा का करतो आहेस माझी !

**विनायक:**—( एकदम गंभीरपणा धारण करून ) बाबा, खरी गोष्ट अशी आहे, कीं माझं पहिल्यान्दां उर्मिळेवर प्रेम होतं—पण पुढं आमचं भांडण झालं !

**बाबा०:**—भांडकुद्ळच आहेस तूं !—बरं मग पुढं काय झालं ?

**विनायक:**—मग मी तिच्यावर संतापून उषावर प्रेम करायला लागलों !

**बाबा०:**—सर्व जगावर प्रेम करीत सूट !

**विनायक:**—बाबा ! या प्रेमाच्या कटकटींतून सुटण्याकरतां तर मी तुम्हाला त्या ओठ तुटलेल्या, कान फाटलेल्या—मिशावाल्या मुलीशीं लग्न करायला सम्मती दिली होती !

**बाबा०:**—फाजीलपणा पुरे कर ! पुढं काय झालं ?

**विनायक:**—पुढं असं झालं, कीं आम्ही तिघे जेव्हां एकत्र आलों, तेव्हां आम्हाला कळून चुकलं—कीं माझं उर्मिळेवर भावनाप्रधान प्रेम आहे—अन् उषावर बुद्धिप्रधान प्रेम आहे !—याच्या उलट उषाचं माझ्यावर भावनाप्रधान प्रेम आहे—आणखी उर्मिळेचं बुद्धिप्रधान प्रेम आहे ! तेव्हां आम्हा सर्वांना मोठा पेंच पडला आहे—अन् त्यावर मी असा उपाय शोधून काढला आहे—

**बाबा०:**—काय उपाय शोधून काढला आहे ?

**विनायक:**—उपाय असा, कीं आम्ही तिघांनीं आणखी दोन तीन वर्षं अविवाहित राह्यचं, आणखी शेवटीं ज्या दोघांचं एकमेकांवर प्रेम टिकून राहील त्यांनीं लग्न करायचं !

**बाबा०:**—मूर्खा ! साहेबांचीं पुस्तकं वाचून वाचून तुझ्या डोक्यांत फक्त

साहेबी विचारच यायचे ! जर संध्या नेमानं केली असतीस—ब्रह्मकर्म केलं असतंस, तर इतक्या घोटाळ्यांत पडला नसतास ! "संशयात्मा विनश्यति" हें गीतेंतलं तत्त्व विसरलास वाटतं !

**विनायकः**—तुम्ही काय म्हणतां तें मला नाहीं समजत बाबा !

**बाबा०ः**—अरे मूर्खा ! तुझं दोघींवर प्रेम आहेना ?

**विनायकः**—हो !

**बाबा०ः**—मग दोघींशीं लग्न कर !

[ विनायक खेरीज सर्वजण खूप हंसतात ]

**विनायकः**—( चिडून ) दोघींशीं बाबा ? दोघींशीं !

**बाबा०ः**—हो ! हो ! दोघींशीं ! आपल्या घरीं खायला कमी आहे वाटतं !

[ उषा व उर्मिळा एकमेकींकडे पाहून खूप हंसतात ! ]

**विनायकः**—बाबा, मी तर तुमचं हे बोलणें ऐकून आश्चर्यानं...

**बाबा०ः**—त्यांत आश्चर्य कसलं वाटतं रे तुला ? पृथ्वीराज, शिवाजी, श्रीकृष्ण, मनूराजा हे सारे मूर्ख होते कायरे ? मनूराजाचं तर स्पष्ट मत आहे, कीं पुरुषांना अनेक स्त्रिया पाहिजेतच मुळीं !—अन् शिवाय तुझ्या पत्रिकेंत सुद्धां द्विभार्या योग आहे !—पत्रिका खोटी पाडतोस काय ?

[ विनायक हरल्यासारखें दाखवून खुर्चीवर अंग फेंकतो ]

**बाबा०ः**—चला, नक्की काय ठरवायचं तें ठरवा ! ( जातां जातां ) प्रभाकरपंत, तुम्ही वाचलं आहेत नाहीं थोडं ज्योतिष—तुम्ही या थोड्या वेळानं, मी याची पत्रिका दाखवतो तुम्हाला. ( जातात )

**विनायकः**—( बाबासाहेब गेल्याबरोबर आवेशानं ) उषा—उर्मिळा—तुमच्या पैकीं एकीला तरी माझ्याशीं लग्न केलंच पाहिजे !

**उषाः**—
**उर्मिळाः**— } कारण ?

**विनायकः**—कारण! ( थोडा वेळ कंबरेवर हात देऊन त्यांच्याकडे पहात ) कारण?

**उर्मिळाः**—( हंसत ) हो हो, कारण!

**विनायकः**—अग असला नवरा मिळविण्याकरतां नाहीं—तरी निदान असला सासरा मिळविण्याकरतां तरी करा!—असला सासरा हातचा जाऊं देणार!—आणखी अगदीं एखाद्या तिऱ्हाईत मुलीला मिळूं देणार!!

[ सर्वजण हंसतात ]

पडदा पडतो.

---

